# भिंतीवरील छाया

: लेखिका :

कृ ष्णा हा थि सिं ग

अनुवादक

गोपीनाथ तळवलकर

किंमत साडेचार रुपये

## प्रस्तावना

काहीं वर्षांपूर्वी मी तुरुंगामध्यें असतांना माझ्याबरोबर कांहीं राजबंदिनी व साध्या कैदी स्त्रिया होत्या. त्यांच्या जीवन वृत्तांतावरून या कथा रचिल्या आहेत. या सर्व सत्यकथा आहेत. पण त्या लिहितांना थोडीफार कलेची जोड त्यांना द्यावीच लागली; कारण त्यावांचून या व्यक्तींचा जटिल भाग नीट उकलून दाखविणें शक्य झालें नसतें.

माझ्या जुन्या मैत्रिणींच्या हातांत हें पुस्तक पडलें आणि आपापले तोंडावळे त्यांनीं ओळखले, तर त्यांच्या परवानगीवांचून त्यांचें जीवन मीं रंगविल्याबद्दल त्या मला क्षमा करतील अशी आशा आहे. तुरुंगांतील खडतर जीवनांतल्या हाल-अपेष्टा देशाच्या स्वातंत्र्याकरितां ज्यांनीं धैर्यानें व निग्रहपूर्वक सोसल्या असे शेंकडों स्त्री-पुरुष आपल्या देशांत आहेत. त्यांच्यापैकीं कांहींच्या कथांचा हा संग्रह आपल्या लढ्यांतील अनेक ' अज्ञात वीरांना ' मी कृतज्ञतेचें चिन्ह म्हणून समर्पण करीत आहें.

माझ्या साध्या गुन्हेगार मैत्रिणींपैकीं कुणी जिवंत असल्याच तर त्यांना या पुस्तकाची वार्ता कळणारही नाहीं. त्यांना पुन: भेटावें आणि त्यांच्या दुर्दैवाचे फणकारे कमी करण्यास यथाशक्ति हातभार लावावा असें मला नेहमीं वाटतें. त्यांना कष्टाचें जीवन मिळालें, दारिद्र्य, उपासमार, मनोवेदना यांच्यामुळेंच या स्त्रियांच्या हातून अनिच्छेनें गुन्हे घडले आणि लांब लांब मुदतीच्या शिक्षा होऊन त्या तुरुंगांत पडल्या. ज्या समाजानें त्यांना गुन्ह्याला प्रवृत्त केलें, तोच समाज त्यांना गुन्हेगार समजून व त्यांच्याशीं कडकपणें वागून त्यांना सुधारूं पाहतो. तुरुंगांत जनावराप्रमाणें फटके मारून त्यांच्याकडून हुकुम पाळून घेण्यांत येतात. पण तुरुंगाच्या जीवनांत कपट, चौर्य, दंभ, असत्य भाषण यांचीच खरी संथा मिळते.

न्यायशास्त्रज्ञ कांहींहि म्हणोत, आज ज्या तऱ्हेची वागणूक मिळते तीमुळें कैद्यांत कांहींच सुधारणा होऊं शकत नाहीं अशी माझी खात्री झाली आहे. माणुसकीचे हक्कच नाकारले गेल्यामुळें कैद्यांतील दुष्ट विकार जागृत होतात आणि सामाजिक जीवनाविषयीं त्याला आस्था वाटेनाशी होते. ज्या राजबंद्यांना असे खडतर अनुभव आले आहेत, त्यांचाही परकीय सत्ता नष्ट करण्याचा निश्चय दृढतर झाला आहे.

मनुष्य हा जात्या गुन्हेगार नसून कित्येकदा परिस्थितीच्या दाबामुळें तो तसा बनतो; या सत्याचा प्रत्यय यावा आणि आपल्या बांधवांना तुरुंगांत जनावराप्रमाणें वागविण्याची जी पद्धति आहे, ती नष्ट करण्याची श्रद्धा लोकांत, विशेषतः कारावासाचा खडतर अनुभव घेतलेल्या लोकांत प्रदीप्त व्हावी या हेतूनें हें पुस्तक लिहिलें आहे. भविष्यकाळांत आपण आपल्या तुरुंगांतील बांधवांना विसरणार नाहीं अशी आशा आहे.

मुंबई, १५ मे १९४६ — **कृष्णा हाथिसिंग**

**ता. क.**—'रेखा' आणि 'शरबती' हीं प्रकरणें अनुक्रमें 'संडे क्रॉनिकल' आणि '**भारत** ज्योति' यांत कांहीं काळापूर्वी प्रसिद्ध झालीं. या संग्रहांत तीं घेण्याची परवानगी दिल्याबद्दल मीं संपादकांची आभारी आहें.

—**कृ. हा.**

# अनुक्रम

## शफीकाँ



"आज रात्रीं कांहीं ताप देऊं नका बरं का?" दरवाजाला कुलुप घालून किल्ली खिशांत ठेवीत शफीकाँ म्हणाली, "तुम्ही कधीं पाहिले नसतील इतके तुरुंग मीं पाहिलेले आहेत. सर्व तऱ्हेच्या कैद्यांचा मला अनुभव आहे. मात्र जाडेभरडे कपडे नेसणाऱ्या तुम्ही सुरेख चेहऱ्यामोहऱ्याच्या बाया मला नवीन वाटतां. कशाहि असा तुम्हीं; लक्षांत ठेवा, तुमच्यापैकीं कुणाची आगळीक चालूं देणार नाहीं मी कुणी त्रास देण्याचा प्रयत्न केलांत तर या इतर वॉर्डर बाया आणि मी तुम्हांला चोप द्यायला मागंपुढं पाहणार नाहीं. तुम्ही कुणीहि बड्या असलां, तरी त्याची मला पर्वा नाहीं. तुमच्या सुंदर चेहऱ्याचा माझ्यावर कांहीं परिणाम होणार नाहीं आणि ज्या जाड्या-भरड्या साड्या नेसायचा तुम्ही इतका हट्ट धरतां त्यांचंहि वजन माझ्यावर पडणार नाहीं." कोंडलेल्या दहा राजबंदिनींना शफीकाँनें हा इषारा दिला. मग हातपाय तणावून ती जमिनीवर एका पटकुरावर आडवी झाली. आपल्याशीं कांहीं वेळ ती बडबड करीत होती. इतर तीन वॉर्डर बाया शफीकाँकडे अथवा राजबंदींकडे लक्ष न देतां आपसांत बोलत होत्या.

त्या दहा राजबंदिनी एकमेकांकडे चौकस नजरेनें पाहत राहिल्या. आपणां-कडून कांहीं प्रक्षोभक कृत्य घडलें नसतां आपणांवर हा हल्ला कां व्हावा, याचें त्यांना आश्चर्य वाटत होतें. त्याच दिवशीं त्यांना त्या तुरुंगांत आण-ण्यांत आलें होतें आणि आपल्या इच्छेप्रमाणें वागण्याची मोकळीक देण्यांत आली होती. त्या लहानशा बंद आवारांत दिवसभर त्या भटकत होत्या. इतर कोठड्यांतून व बराकींतून त्या दृष्टिक्षेप टाकीत. या सर्व ठिकाणीं कैदी कोंडलेले होते. या सर्व राजबंदिनींची तुरुंगांत येण्याची ही पहिलीच खेप होती. त्यांना एकंदरीनें कांहीं बरें वाटत नव्हतें. माध्या कैदी स्त्रिया त्यांना टाळीत किंवा संशयानें त्यांच्याकडे पाहत. मध्यान्हकाळीं पाच वाजतां असा

हुकूम आला कीं या सर्व राजबंदिनींना दुसऱ्या दिवशीं सकाळीं पांचपर्यंत कोंडून ठेवण्यांत यावें. या हुकुमाचा राजबंदिनींना फार विषाद वाटला; पण दुसऱ्या दिवशीं सकाळीं जेलचा मुख्याधिकारी येईल त्याच्याशीं यासंबंधीं बोलायचें असें त्यांनीं ठरविलें. ती बराक अगदीं भयाण होती. दहा राजबंदिनींकरितां दहा पातळ गाद्या तेथें होत्या. आणि सत्य-अहिंसेची शपथ घेतलेल्या या राजबंदिनींवर पहारा करण्यासाठीं भयंकर स्वरूपाच्या चार कैदी मुकादम स्त्रिया नेमण्यांत आल्या होत्या.

यांपैकीं तीन वॉर्डर स्त्रिया बुट्टया, आडव्या, आणि दुष्ट चेहऱ्याच्या दिसत. त्यांचे कपडे घाण होते आणि रुक्षकेसांच्या जटा डोळ्यांवर आल्या होत्या. त्यांचें राजबंदिनींकडे मुळींच लक्ष नव्हतें असें म्हटलें तरी चालेल. आपसांत त्यांचें बोलणें चाललें होतें. चेष्टामस्करी आणि जेलमधील नव्या भानगडी हे विषय बोलण्यांत मुख्यतः येत. शफीकाँनें मात्र या बोलण्यांत भाग घेतला नाहीं. ती जागी असून एकटीच दूर पडली होती. इतर वॉर्डर स्त्रियांपेक्षां किती वेगळी होती ती! ती अंगानें सडपातळ व उंचीला सुमारें पांच फूट दोन इंच होती. तिचे नाकडोळे रेखीव होते. विशेषतः तिचे हातपाय फार लहान व विलक्षण सुंदर दिसत. ती शांत असली कीं तिचा चेहरा बराच आकर्षक दिसे; पण बहुतेक वेळां क्रौर्याचा व कपटाचा भाव त्यावर उमटलेला असे. तिच्या फटकळपणाची ख्याति तुरुंगांत फार होती आणि तरुण-वृद्ध कैदी स्त्रिया तिला घाबरून असत. पण असें असलें तरी इतर वॉर्डर स्त्रियांप्रमाणें शफीकाँनें कुणाला बडविल्याचें कुणाला ठाऊक नव्हतें. इतरांपेक्षां ती कांहीं वेगळीच गणिली जाई. जेलची मुख्याधिकारी बाईसुद्धां शफीकाँच्या बोलभांडपणाला आणि उद्धटपणाला जरा बिचकलेलीच असे. सोळा वर्षें तुरुंगांत घालवूनसुद्धां तिच्यांत मार्दव कसें तें आलें नव्हतें.

गुन्हेगारीच्या पातळीवर शफीकाँ ओढली जाण्यापूर्वी साहजिकच शफीकाँनें चांगले दिवस घालविले होते, तिचें जीवन सुखमय होतें. मग जन्मठेपीसारख्या जबर शिक्षेचा गुन्हा करण्यास ती कां प्रवृत्त झाली? तिच्याशीं सख्य जुळविण्याचे प्रयत्न राजबंदिनी अनेक महिने करीत होत्या. पण दर वेळीं शफीकाँ त्यांची निराशा करी आणि त्यांना थप्पड मिळे. इतर सामान्य

कैदी स्त्रिया राजबंदिनींकडे प्रेमानें येत आणि वार्डर स्त्रियांची बहिरीससाण्या-सारखी दृष्टि चुकवून मोठ्या आस्थेनें बाहेरच्या दुनियेसंबंधीं अगणित प्रश्न विचारीत. जीवनांतला अधिकांश काळ त्यांचा या दुनियेशीं संबंध तुटला होता. बहुतेक गुन्हेगार स्त्रियांना दोनच जगें महत्त्वाचीं वाटत. 'जेल-खाना' आणि 'दुनिया' यांखेरीज त्यांना दुसरें कशांतच गम्य नसे. पण ज्या या कारागृहांतून सुटणें शक्य नाहीं त्याच्या भिंतीबाहेर काय चाललें आहे याविषयीं शफीकॉं पूर्ण बेफिकीर असे.

बहुतेक राजबंदी स्त्रिया मध्यम वयाच्या होत्या. तीनच काय त्या वीस वर्षांखालील मुली होत्या. यांपैकीं कृपा म्हणून जी होती, तिनें शफीकॉंशीं मैत्री करण्याचा किती प्रयत्न केला; पण व्यर्थ! एके दिवशीं शफीकॉंशीं बोलण्याचा निष्फळ प्रयत्न करणारी एक जाणती राजबंदिनी शफीकॉंला म्हणतांना एका मुलीनें ऐकलें, "तूं आमच्याशीं इतकी तुसडेपणानें कां वागतेस ग? काय तुझं आम्ही घोडं मारलं आहे? नेहमीं दूर राह्यचं, कांहीं प्रेमानं एकत्र बसून खाऊं म्हटलं तर खायचं नाहीं! हें काय ग तुझं? आपल्या या लहान मुलींचं सदा काय उणं काढतेस? माझ्या बाई, तूं जर स्नेहभावानं वागशील, तर तुलाच सुख होईल. तुझ्याकरितां आम्ही या तुरुंगांत अधिक कांहीं करूं शकत नाहीं. पण निदान सोबतिणी बनून आपण एकमेकींना मदत तर करूं शकतो कीं नाहीं?"

"तुम्ही मला मदत करणार?" शफीकॉं खेंकसून म्हणाली, "कोण समजतां तुम्ही आपल्याला? तुम्ही अन् तुमचे गोरेगोमटे चेहरे काय करा-यचे आहेत? अल्लासुद्धां मला मदत करूं शकणार नाहीं! मग तुमची तर गोष्टच सोडा. तुम्हां सर्वांचा मला तिटकारा वाटतो. आपण सर्वजण कैदी असलों तरी तुम्ही आमच्याहून किती वेगळ्या आहांत? तुम्हांला शिक्षा झाली खरी; पण कशाकरितां? कांहीं शौर्य गाजविलं म्हणून खास नव्हे. मला तर तुम्ही सर्वजणी मूर्ख वाटतां. सरकारनं बंदी केलेल्या एका सभेला तुम्ही गेलांत आणि तुम्हांला पकडलं. काय गाढवपणा आहे! कशाला तुम्ही जग सुधरायला निघतां? तुम्हीं कांहींहि केलं तरी जग आहे तसंच राहणार! माझ्याकडे पाहा. मी खुनी आहें आणि याचा मला अभिमान आहे. मी

जगांत कशालाहि भीत नाहीं. मी आज सोळा वर्षं तुरुंगांत आहें आणि आणखी पांच-सहा वर्षांनीं तुरुंगाबाहेर पडेन. मी जें केलं तें करायला धैर्य लागतं. मेंढरासारखं तुरुंगांत कोंबून घेण्यांत काय धैर्य दाखविलंत तुम्ही ! छे ! तुमच्यासारख्या लोकांचा कांहीं उपयोग नाहीं मला."

"शफीकाँ, तूं आमच्याशीं मैत्री करूं नको. पण तूं सर्वांत शूर आहेस ही मात्र कल्पना सोडून दे. महात्मा गांधींचं नांव ऐकलं आहेस तूं?" शफीकाँनें मान हलविली. ती राजबंदिनी पुढें बोलूं लागली, "बरं, तुला ठाऊक आहे, ब्रिटिश हिंदुस्थानवर राज्य करतात आणि गांधीजींनीं आम्हांला त्यांच्याशीं लढायला आणि त्यांच्या दास्यांतून देश स्वतंत्र करायला शिकवलं. आमच्याजवळ शस्त्रास्त्रं, दारूगोळा, कांहीं नव्हतं. पुन्हां शस्त्रांनीं दुसऱ्यांशीं लढण्यावर गांधीजींची श्रद्धा नाहीं. म्हणून त्यांनीं आम्हांला अहिंसेनं लढायला शिकवलं. लाठ्या खाव्या, बंदुकीच्या गोळ्यांना तोंड द्यावं, भित्र्यासारखं त्यांच्यापासून पळून जाऊं नये, ही गांधीजींची शिकवण होती. देशाच्या स्वातंत्र्याकरितां आम्ही बाहेर राहून काय करूं, या गोष्टीचं सरकारला भय वाटतं. म्हणून तर आम्हां हजारों लोकांना तुरुंगांत डांबून ठेवण्यांत येत आहे. आम्ही आपण होऊन आंत आलों आहों आणि याला तुला वाटतं त्यापेक्षां फार धैर्य लागतं. स्वतंत्र हिंदुस्थानांत आपण सर्व एका पातळीवर मैत्रिणी म्हणून येऊं असं आम्हांला वाटतं. आम्हांला तुझ्याशीं मैत्री करण्याची फार इच्छा आहे; पण तुलाच आम्ही आवडत नसलों तर तें आमचं दुर्भाग्य म्हटलं पाहिजे. तुला आम्ही त्रास देणार नाहीं." एवढें बोलून ती बाई जाऊं लागली. तों मार्दवपूर्ण आवाजांत शफीकाँ म्हणाली, "माताजी, मी फार निष्ठुर वागलें याचं वाईट वाटतं मला. आमच्यासारख्यांना गुन्हे कां करावे लागले आणि तुरुंगांत कां यावं लागलं याचा विचार न करतां जे आम्हांला सुधारण्याचा प्रयत्न करतात, त्याचा मला राग येतो. तुमच्या लढण्याच्या पद्धती मला मंजूर नाहींत. अर्थात् केव्हां तरी तुम्ही मला त्या तपशीलवार सांगून पटवूं शकाल. पण सारा दिवस तुमच्याशीं बोलण्यांत मी खर्च करीन असं मात्र समजूं नका." मध्यें क्षणभरच विसरलेला आपला उद्धटपणा पुनः प्रकट करून शफीकाँ म्हणाली.

कृपानें हा संवाद ऐकला. शफीकाँनें ज्या आवरणांत आपणांला गुंडाळून घेतलें होतें तें फोडण्याचा तिनें निर्धार केला. कृपानें इतर कैद्यांकडून तिची माहिती मिळविली आणि तिला कळून आलें कीं शफीकाँ आपल्याच शहरची रहिवासी आहे. शफीकाँच्या भांडकुदळपणानें ती नेहमीं त्रासून जाई; पण आतां तिला शफीकाँची कींव वाटूं लागली. सोळा वर्षें बाह्य जगाशीं संबंध तुटणें किती भयंकर आहे! एकलकोंडेपणा, आप्तमित्र नाहीं, बाहेर पडल्यावर जिथें परत जावें असें कुटुंब उरलेलें नाहीं— हीच बहुतेक जन्मठेपेच्या कैद्यांची स्थिति होती. तिनें शफीकाँशीं बोलायचा निश्चय केला. एके दिवशीं सकाळीं कोठडीबाहेर ती दोर वळीत असतां कृपा तिच्याजवळ गेली आणि तिच्याजवळ बसत म्हणाली, "शफीकाँ, तुला ठाऊक आहे का? तूं आणि मी एकाच गांवच्या आहोंत." शफीकाँ कांहींच बोलली नाहीं. कृपा पुढें म्हणाली, "माझा जन्मच झाला तिथं. माझे वडील श्रीमंत आहेत. कात्रा बाजाराच्या बाहेर एका टोलेजंग घरांत राहतों आम्ही. तूं जवळच राहतेस कीं गांवाच्या आंतल्या बाजूस?" तरीहि शफीकाँ गप्पच होती. कृपानें तिचे खांदे धरून हालविले. पण तिला बोलायला लावण्याचा प्रयत्न करणें महाकर्म कठीण आहे असें कृपाला दिसून आलें; म्हणून ती उठली तों शफीकाँनें हात पुढें केला आणि सावकाशपणें ती बोलूं लागली, "बिबी, जाऊं नको. माझ्या गांवचं माणूस किती वर्षांत मला भेटलं नाहीं. प्रत्येकाशीं निष्ठुरपणें आणि अंदेशा घेऊनच मला वागावं लागतं. कुणावर विश्वास ठेवूं नये किंवा कुणाशीं जास्ती सख्य नसावं. हेंच आपण तुरुंगांत शिकतों. कारण बहुतेक वेळां आपला भ्रम दूर व्हायचीच पाळी येते. माझ्या वागणुकीची मला क्षमा कर. काय म्हणालीस तूं? कात्रा बाजारांत राहतेस? त्या टोंकावरचा तो मोठा इमला तोच का तुझ्या वडिलांचा? मी बरोबर दुसऱ्या बाजूला राहतें." दूर कुठं तरी दृष्टि खिळल्यासारखें करून ती म्हणाली, "मीं पुष्कळदां म्हणायची, हें घर आंतून किती छान असेल! पण आंत शिरण्याचा कांहीं मला धीर झाला नाहीं. माझे वडील सांगत, तेथील एखाद्या नोकरानं तुला पकडलं तर तो तुला मार देईल. पण माझा त्यावर विश्वास नव्हता. पण काय ग, तूं माझ्या जीवनाबद्दल इतकी कां आस्था दाख-

वतेस ?" पुनः एकदां प्रतिकारवृत्तीच्या मूळ पदावर येऊन शफीकाँ म्हणाली, "माझ्यासारख्यांना ज्यामुळें गुन्हे करावे लागतात त्या दुःखाची, दैन्याची अन् दारिद्र्याची कांहीं माहिती आहे का तुला ?"

"अऽहो शफीकाँ," तिच्याशेजारीं ठाण मांडीत कृपा म्हणाली, "अर्थात् तुझी सारी सारी माहिती मला पाहिजे. आपण शेजारी आहोंत हें विसरूं नको. मी अशा तऱ्हेनं तुला माझ्याशीं बोलूं देणार नाहीं. मला एकलेपणा वाटूं लागला, घराची आठवण झाली आणि कुणी गांवकरीण बोलायला मिळाली तर बरी, असं वाटलं. सुदैवानं तूं भेटलीस. पण तूं पुनः तुटकपणं वागूं लागशील ! चांगलं का हें ? पण अर्थात् तुला बोलायचंच् नसलं तर ही मी चाललें."

शफीकाँच्या डोळ्यांत अश्रू तरळूं लागले आणि कांहींसें मनाशीं आणि कांहींसें मोठ्यानें ती बोलली, "काय, कात्रा बाजार म्हणालीस ? कात्रा बाजारांतच घर आहे माझं ? पण कसं काय असेल तिथं आतां ? तो जुना पिंपळ आहे का तसाच ? त्या पिंपळाच्या ढोलींत आम्हीं लहानपणीं मिठाई लपवून ठेवीत असूं. तसाच आहे का ग बाजार ? जुनी घरं जशींच्या तशींच आहेत ? अग बिबी, मी जें विसरायचा प्रयत्न करीत होतें, त्याची कशाला ग आठवण करून दिलीस ?" आणि ती निढावलेली गुन्हेगारीण, साऱ्या मुलखाची फटकळ, आणि प्रेम, दया, स्नेह या भावना कधीं प्रकट न करणारी शफीकाँ एकदम ऊर फुटे तों रडूं लागली.

कृपा स्तब्ध होती. तिनें शफीकाँला भरपूर रडण्यास अवसर दिला. वर्षानुवर्षें कोंडून ठेवलेल्या भावनांना अश्रुरूपानें बाहेर वाट दिल्यामुळें तिला किती बरें वाटत असेल याची कृपाला कल्पना होती. अखेर शफीकाँ शांत झाल्यावर कृपा म्हणाली, "गेल्या कित्येक वर्षांमध्यें आपल्या गांवांत खूप बदल झाला आहे, शफीकाँ. मुख्य रस्त्याच्या त्या टोंकाचं तें मिठाईचं दुकान आणि त्याच्या शेजारचं तें पटांगण आठवतं तुला ? तिथं लहान मुलं नेहमीं खेळायचीं बघ. तिथं गवत वाढायचं अन् घाण सांठायची. आतां त्या ठिकाणीं सुंदर फुलांचा बगिचा उठला आहे. एक पोहण्याचा हौदसुद्धां केला आहे तिथं. कॉलेजांतलीं व इतर तरुण मुलं त्या ठिकाणीं पोहायला

येतात. बगीचासमोर कांहीं घरंही झालीं आहेत. आणि लहानसहान बदल झाले आहेत."

"नाहीं. पूर्वी तिथं बगीचा नव्हता अन् बागहि नव्हती." शफीकाँ मान हलवून म्हणाली, "पण मिठाईच्या दुकानामागील तें सुंदर मंदिर मला आठवतं. माझा सोबती रामा आणि त्याची आई त्या ठिकाणीं नेहमीं जायची. जवळ मशीद होती तिथं माझे भाऊ व वडील जात. अल्लाच्या प्रार्थनेचं तें मंदिर मला अत्यंत नयनमनोहर वाटे. मला आंत जाऊं देत नसत; पण मी बाहेर बसून तासचे तास त्याकडे पाहत राहीं. नंतर माझं लग्न झालं. पुढं मग मी पडद्यातच असें. बिबी, तुझ्याहिपेक्षां मी लहान होतें तेव्हां. काय जीवनांत मौज वाटायची तेव्हां! मला लग्न करावंसं वाटत नव्हतं; पण माझ्यावर सक्ति करण्यांत आली आणि त्यानंतर दुःखामागून दुःखं सुरू झालीं. पहिल्या दिवसापासून मला सारं घरकाम करावं लागे. आणि माझी सासू जेव्हां देवतार्चन करीत नसे, तेव्हां सारखी मला शिव्यांची लाखोली वाही. माझा नवरा घरीं असे तेव्हां ही बाई मोठा भाविकपणाचा आव आणून वागे; जणूं देवाच्या चिंतनावांचून हिला दुसरा विषयच नाहीं असं वाटावं. पण तो बाहेर कामाला गेला कीं ही मला शिव्या मोजूं लागे आणि मार देई. माझ्या अंगावर माराचे काळे–निळे वळ उठत. हात आंखडून जात. माझा नवरा पशु होता. तो माझा हवा तसा उपभोग घेई आणि मला कुत्र्या-सारखं वागवी. वर्षभर हें सारं मीं निमूटपणें सहन केलं. नंतर माझं बाळ जन्माला आलं.बाळाच्या जन्माच्या आधीं कांहीं महिन्यांपासून माझ्या पतीनं आपली रखेली घरांत आणावयास सुरुवात केली. माराच्या भीतीनं मीं या-विषयीं तक्रार केली नाहीं. बाळ जन्माला आल्यापासून माझा नवरा माझ्याशीं पुष्कळ चांगला वागूं लागला. तो मधूनमधून मला कांहीं सुंदर वस्तू भेट म्हणून आणूं लागला. हा सारा बदल माझ्या मुलामुळं झाला आहे हें मला ठाऊक होतं. कारण माझा मुलगा खरोखरच फार गोजिरवाणा होता आणि त्यानं सर्वांचीं मनं जिंकून घेतलीं होतीं. नवऱ्याची ती रखेली पुढं घरीं येईनाशी झाली आणि मीहि सारं विसरून गेलें. पुढं काय झालं, बाळ सहा महिन्यांचा असेल. मी एकटीच होतें घरीं. दारावर थाप ऐकूं

आली. मीं दार उघडलं. तों ती रखेली हातांत मेवामिठाईचं ताट घेऊन उभी असलेली दिसली. मला पाहतांच ती हंसून म्हणाली, " आंत येऊं देतेस मला ? तुला बाळ झाल्याबद्दल धन्यवाद द्यायला आलें आहें. फार मस्त पोरगा आहे म्हणतात !" मी रस्त्यांतून बाजूला झालें नाहीं. दारामध्येंच उभी राहिलें. मला कांहीं तरी संशय आला;पण काय करावं तें मात्र कळेना. इतक्यांत माझा नवरा घरीं आला. तिला आंत घेण्याशिवाय गत्यंतरच उरलं नाहीं मला. माझा नवरा तिच्याशीं नीटपणं पण रुक्ष पद्धतीनं वागत होता. डोक्यावरचं ओझं उतरल्यासारखं वाटलं. आम्ही बसलों, बोललों. तिनं माझ्या झोंपलेल्या बाळाकडे पाहिलं आणि त्याचं खूप खूप कौतुकहि केलं. मग तहान लागली म्हणून तिनं पाणी प्यायला मागितलं. नंतर माझ्या नवऱ्याला तिनं सोबतीला आणलेला माणूस बाहेर उभा आहे कीं नाहीं हें पाहण्यास सांगितलं. खोलींत झोंपलेलं बाळ आणि ती एवढींच राहिलीं. मी पाणी घेऊन परतलें, तेव्हां ती जिथं होती तिथंच उभी असलेली दिसली. कांहीं वेळानं ती गेली. तिच्याबरोबर माझा नवराहि गेला. मला कांहीं तरी अकल्पित भीतीनं पछाडल्यासारखं झालं. मी बाळापाशीं आलें. मीं ठेवलेल्या पांघरुणानं त्याचं तोंड झाकलेलं होतं. त्याची झोंपमोड होऊं नये म्हणून मी हळूच तें पांघरूण दूर केलं. तों डोळयांना काय भयंकर दृश्य दिसलं ! माझे पंचप्राण बधिर होऊन गेलं. माझ्या बाळाचं सर्वांग रक्तानं माखलेलं होतं. त्याचा गळा कापला .होता ! शब्दहि न उच्चारतां तें पोर यमसदनाला गेलं होतं ! माझं डोकं फिरूं लागलं आणि वाटलं कीं खूप मोठ्यानं किंचाळावं; पण तसाहि धीर झाला नाहीं.मग मला वाटतं, मी बेशुद्ध झालें. मी शुद्धीवर आलें तेव्हां कांहीं वेळ काय झालं तें मला कळेना. मग सर्व उमजलं. मी ताडकन् उठलें आणि माझं मेलेलं पोर पोटाशीं धरून कधीं नाहीं इतकी रड रड रडलें. नंतर एकदम मी स्तब्ध झालें. मी बाळाला खालीं ठेवलं; त्याच्यावर पांघरूण घातलं आणि घरांत कुऱ्हाड आणायला गेलें. संध्याकाळ पडली होती. अशाच वेळीं कुऱ्हाड घेऊन त्या रखेलीच्या घरीं गेलें. मी बाजारांतून अशी पळत जात असतां कोणी पाहील किंवा कोणाला काय वाटेल, याची फिकीर मीं केली नाहीं. माझ्या मनांत एकच विचार होताः तिनं माझ्या बाळाला मारलं आहे,तेव्हां मी तिला मारणार! मी

तिच्या घरीं पोंचलें आणि थोडा दम खाण्याकरितां लपून बसलें. खिडकींतून दिव्याच्या प्रकाशांत माझा नवरा माझ्या बाळाचा खून करणाऱ्या त्या बाईच्या गळ्यांत गळा घालून बसलेला मला दिसला.माझ्या नवऱ्याची पकड चुकवून मीं तिच्यावर कुऱ्हाडीचा घाव घातला. ती खालीं कोसळली; पण पुनः पुनः तिच्यावर राक्षसी बळानं घाव घातले. मला पकडण्याचा माझ्या नवऱ्यानें प्रयत्न केला,पण मीं त्यालाहि कुऱ्हाडीचा एक तडाखा दिला. मला थांबवणें अशक्य आहे, असें पाहून तो मदतीसाठीं ओरडत बाहेर पळाला, पण मी थांबलें नाहीं. थोड्याच वेळानें खोलींत माणसाची ही गर्दी झाली आणि त्यांनीं मला आवरून पकडलं आणि ते मला पोलिस टाण्यावर घेऊन गेले. नंतर खटला झाला. माझ्या वकिलानं हें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला कीं रखेलीनं माझ्या मुलाला ठार केलं म्हणून मीं तिचा खून केला. पण माझ्यावर कोणींच विश्वास ठेवला नाहीं. माझ्या नवऱ्यानं तर सांगितलं कीं मीच मुलाचा खून केला असला पाहिजे. आपण सर्व वेळ खोलींत होतों आणि रखेलीनं मुलाच्या अंगाला हात लावला नाहीं, असं त्यानं शपथेवर सांगितलं. ही माझी कहाणी आहे. आणखी सहा वर्षांनीं मी सुटेन. पण हें ठिकाण सोडून बाहेर जाण्याची माझी इच्छा नाहीं. कारण बाहेर जाऊं कुठं ? इतक्या वर्षांत घरांतलं कुणीं मला भेटायला आलं नाहीं कीं बोटभर चिठ्ठी कुणी पाठविली नाहीं. कोण मेलं आहे आणि कोण जिवंत आहे याची मला माहिती नाहीं. बहुधा माझ्यासारख्या खुनी बाईशीं त्यांना कसलंहि नातं ठेवायचं नसेल. पण इतकीं वर्षं यातना भोगूनहि, माझ्या बाळाचा खून करणाराला कंठस्नान घातलं याबद्दल मला वाईट वाटत नाहीं. पण मी बाहेर पडलें म्हणजे लोक माझ्याकडे भीतीनं पाहतील आणि म्हणून माझ्या सुटकेबद्दल मी फारशी उत्सुक नाहीं. या तुरुंगांतच मी मरून जाईन आणि अशा रीतीनं माझा प्रश्न सुटेल."

कृपा कांहीं बोलली नाहीं. पण शफीकाँची कहाणी ऐकून ती विव्हळ झाली होती. शफीकाँला बाहेर पडल्यावर घर नसावें आणि म्हणून तिला अनाथ वाटावें, याचें तिला फार दुःख झालें. ती म्हणाली, "शफीकाँ, मी माझा पत्ता ऑफिसांत ठेवीन आणि तूं सुटल्यावर जरूर माझ्याकडे ये. तूं आल्यास मला किती बरं वाटेल! ज्या घराची तुला ओढ होती, तेंहि तुला पाहायला मिळेल.

तूं आलंच पाहिजेस. न आलीस तर वाईट वाटेल मला. " कृपा म्हणते आहे तें खरें असेल काय, अशा वृत्तीनें शफीकाँ कृपाकडे पाहूं लागली. आपल्या नेहमींच्या कठोर आवाजांत ती म्हणाली, " बिबी, वेडी आहेस तूं–तूं काय म्हणतेस हें कळतं तरी आहे का तुला ? मी एक खुनी बाई आहें. लोक माझ्याकडे भीतीनं पाहतात. आणि तूं ? तूं तर खानदान घराण्यांतली मुलगी. तूं तरुण आहेस. केवढं तरी आयुष्य तुझ्यापुढं पडलं आहे. तुझं अजून लग्न व्हायचं आहे. तुला माझ्याकडे नुसतं बघूनसुद्धां चालणार नाहीं. मग घरांत आश्रय द्यायची गोष्ट दूरच. नाहीं, बिबी, मी येणार नाहीं. माफ कर. तूं तुरुंगांत आहेस तोंवर मला हें जिणं कांहीं वेगळं वाटेल. नंतर मी तुला विसरण्याचा प्रयत्न करीन आणि तूंहि मला विसरून जा. "

कृपाचा गळा दाटून आला व आवाजांत ती कातरता न दाखवितां ती म्हणाली, " शफीकाँ, असा वेडेपणा करूं नको. तूं म्हणतेस तसा विचार माझी आई करणार नाहीं. आणि माझी खात्री आहे कीं तूं आमच्या घरीं आल्यानं तिला बरंच वाटेल. तुला जायला दुसरं घर नाहीं. तेव्हां तुझी सुटका होतांच तुला आमच्याकडे पाठवून द्यावं असं मी सुपरिंटेंडंटला सांगून ठेवीन. आतां कांहीं फांटे फोडूं नको. मी तुझं ऐकणार नाहीं. " इतक्यांत घंटा झाली.आपल्या डोळ्यांतील आंसवं पुसून शफीकाँ कामाला निघून गेली.

त्या रात्रीं सर्व कैदी स्त्रिया शफीकाँकडे आश्चर्यानें पाहत होत्या. आज तुरुंगवासांत पहिल्यानेंच ती इतक्या शांतपणें आपलीं कामें करीत होती. तिला काय झालें आहे, हें कोणास कळेना. तिच्या त्या बंद ओंठांतून आज शिवी बाहेर पडली नाहीं. ती नेहमींप्रमाणें आज आपल्याशीं बडबडत नव्हती किंवा तिनें कोणाला धरून ओढलें नाहीं. सर्वांना वाटलें, ही आजारीच आहे खास. कारण शफीकाँचा हा नवा अवतार त्यांना अपरिचित होता. पुढें त्यांचें आश्चर्य ओसरलें. तुरुंगांतलें जीवन असें ठरींवपणाचें असतें.

एका वर्षाच्या कारावासानंतर कृपा सुटली. कृपा निरोप घेऊं लागली तेव्हां शफीकाँ रडत होती. कृपानें शफीकाँला तिची शिक्षा संपल्यावर आपणाकडे येण्याची पुन्हां एकदां आठवण दिली. पण कृपाला मात्र ती आपणांकडे येईल असें वाटलें नाहीं.

कांहीं वर्षे गेलीं. कृपा आपल्या घरासमोरील बगीचांत कोणाशीं बोलत उभी होती. एक अस्पष्ट ओळखीच्या चेहऱ्याची कुणी स्त्री आपणांकडे येतांना दिसली; पण तिनें तिला ओळखलें नाहीं. ती बाई कांहींशी बिचकत भेदरत जवळ आली. तिची कृपाला ओळख पटली. " शफीकाँ " कृपा ओरडली, " आलीस इतक्या वर्षांनीं तूं ? फार आनंद झाला मला. आतां राहशील ना आमच्या इथं " आपलं आनंदाश्रु पुशीत शफीकाँ सस्मित चेहऱ्यानें म्हणाली, " नाहीं. बिबी. मीं भेटेन तुला खूप वेळां; पण राहणार मात्र नाहीं तुझ्या घरीं. दोन दिवसांपूर्वी तुरुंगांतून सुटल्यावर मी माझ्या भावाकडे गेलें. त्यानं माझं चांगलं स्वागत केलं आणि आपण, आपली बायको यांच्यांत मी राहावं असं विनविलं. मी तें कसं नाकारूं ? मी तुरुंगांत गेलें, त्यानंतर माझा भाऊ पंगु झाला. म्हणून तो मला भेटायला येऊं शकला नाहीं. तो म्हणतो, 'मी पुष्कळ पत्रं लिहिलीं पण एकाचंहि उत्तर आलं नाहीं.' पण तुला ठाऊकच आहे कीं मला एकहि पत्र मिळालं नाहीं. कसंहि असो, मी आतां घरीं आलें आहें आणि आनंदांत आहें. बिबी, तुला मी नेहमीं भेटत जाईन. माझ्याकरितां तुरुंगांत तूं जें केलंस, तें मी कधींहि विसरणार नाहीं. "

# चित्रा



हिंवाळ्यांतली सकाळ होती ती. वीस सत्याग्रही बंदी स्त्रियांचा जथा सेंट्रल तुरुंगांत आणण्यांत आला. वर्षभर हेंच त्यांचें आतां निवासस्थान होणार होतें. एका लहानशा इंटर क्लासच्या डब्यांत दाटीवाटीनें बसून पोलिसांबरोबर त्यांना रात्रभर प्रवास करावा लागला होता. सकाळीं मुक्कामाला पोंचेपर्यंत त्या अगदीं थकून शिणून गेल्या होत्या. एका काळ्या मोटरींत त्यांना बसविण्यांत आलें. खरखट् असा आवाज होऊन मोटर सुरू झाली.

आपापल्या घरांतून एकटें दूर येण्याची त्या स्त्रियांची ही पहिलीच वेळ होती. आपल्या सहकाऱ्यांबरोबर त्यांनीं निर्भयपणें काम केलें होतें. कित्येक आठवडे त्यांनीं मिरवणुकी काढल्या होत्या, सभा घेतल्या होत्या, आणि लाठीमाराला तोंड दिले होतें. अखेर सामर्थ्यवान् सरकारला त्याबद्दल भीति उत्पन्न झाली. त्यांच्यामुळें सार्वजनिक शांतता धोक्यांत येईल असें वाटूं लागलें. आणि म्हणून सरकारनें त्यांना पकडण्याचे हुकूम सोडले.

या स्त्रियांत कांहीं १७–१८ वर्षांच्या मुली होत्या, कांहीं वीस ते तीस दरम्यानच्या युवती होत्या, आणि एकदोघी प्रौढ स्त्रिया होत्या. त्या वेगवेगळ्या जातींच्या आणि पंथांच्या होत्या. पण सर्वांची इच्छा आपल्या मातृभूमीची सेवा करावी अशीच होती. सर्वांत तरुण चित्रा ही होती. तिचें वय असेल सुमारें १९ वर्षांचें. तिची आनंदी वृत्ति कधींच मावळत नसे. जेलची गाडी चालू असतां ही इतर कैद्यांबरोबर राष्ट्रीय गीतें गुणगुणत होती आणि गप्पा करीत होती. तो एक नवाच अनुभव होता. तरुण मुलींना त्या अनुभवाच्या केवळ नावीन्यानें उत्साह वाटत होता. जुन्या बाया मात्र जरा मलूल झाल्या होत्या. तुरुंगाच्या जबरदस्त भिंती दिसतांच सर्व बडबड थांबली. सर्व जणी आपापल्याशीं विचार करूं लागल्या. या जेल-यात्रेचें

पर्यवसान अखेर काय होणार ? आतां हें कांहीं अद्‌भुत साहसकर्म उरलें नसून त्याला कठोर वास्तवतेचें स्वरूप आलें होतें. जितक्या जवळ त्या येत, तितकी तुरुंगाची भीषणता अधिक भासे.

कैद्यांची गाडी एका मोठ्या लोखंडी फाटकासमोर थांबली. आणि बाजूचें लहान फाटक उघडलें गेलें. यांतून कैद्यांना आंत प्रवेश मिळणार होता. त्यांना ऑफिसांत नेण्यांत आलें. त्यांच्या सामानाची तपासणी झाली आणि नंतर त्यांच्या कोठड्यांत नेण्याकरतां जेलवरील अधिकारी स्त्री (मेट्रन) आली. एकंदर वीस कैदी होत्या. त्यांचे दहा-दहाचे असे दोन गट पाडण्यांत आले. आणि दोन आवारांत त्यांची व्यवस्था करण्यांत आली. लांबट, चौकोनी अशा स्वरूपाचीं हीं आवारें होतीं. आवारांत दहा दहा पातळ गाद्या होत्या. चोंहींकडे लोखंडी गज होते. एका ठिकाणीं दार होतें. गाद्या गजाजवळ ठेवण्यांत आल्या होत्या. हेतु असा कीं पहारेकरणींना कैद्यांवर नेहमीं दृष्टि ठेवणें सोपें जावें.

कैद्यांना आंत नेण्यांत आल्यानंतर त्यांना असें दिसलें कीं त्या आवारांत चोहींकडे कैदीच कैदी आहेत. कोणी कपडे धूत होत्या; कोणी भांडींकुंडीं साफ करीत होत्या; कोणी जमीन पुसत होत्या, किंवा अशींच कांहीं कामें करीत होत्या. नवीन पाहुण्या बंदी स्त्रिया जवळून जातांना या कैदी स्त्रिया त्यांच्याकडे उत्सुकतेनें पाहत. कोणी प्रेमळपणें हंसे, कोणी उदास दृष्टि टाकी आणि कोणी तिऱ्हाइतासारखें वागे. त्यांच्याशीं कोणी बोललें नाहीं; कारण कैद्याशीं बोलणें हें जेलच्या नियमाविरुद्ध होतें. राजबंदिनींनीं कैद्यांकडे दुर्लक्षच केलें. पण चित्रा मात्र चमकली. एक-दोन बनेल दिसणाऱ्या कैदी तिच्याकडे दृष्टिक्षेप करून आपणाशीं कांहीं बडबडत होत्या. चित्रा तरुण होती. आणि पहिलटकरीण गर्भवती होती. कांहीं भयंकर गुन्हा हातून घडल्यावांचून आणि त्या स्त्रीला बाहेर ठेवणें अशक्य आहे असें सरकारला वाटल्यावांचून गर्भवती स्त्रीला बहुधा तुरुंगांत नेत नाहींत. राजबंदिनींना केव्हांच अशा स्थितींत तुरुंगवास मिळत नाहीं. पण चित्रानें याकडे दुर्लक्ष केलें होतें व आपल्या मैत्रिणीलाहि ती याविषयीं कांहीं बोलली नव्हती. ती आपल्या लहानशा सृष्टींत राहत असे आणि आतांहि तिनें आपलें रहस्य

आपल्याजवळच ठेवलें होतें. ती आठ वर्षांची असतांना एका अपघातांत तिचे आईवडील वारले. तिच्या चुलता-चुलतींनीं आपल्या सात मुलां-समवेत तिचें पालन-पोषण केलें. ते तिला चांगली वागवीत; पण माता-पित्या-कडूनच जें मिळूं शकतें त्या प्रेमाचा, निगेचा आणि जाणीवेचा ओलावा तिला मिळाला नव्हता. ती सुस्वभावी असल्यानें तिनें याविषयीं तक्रार केली नाहीं आणि आहे त्या स्थितींत आनंदानें दिवस काढले. तिनें कॉलेज-चीं दोन वर्षें पुरीं केल्यानंतर वर्षापूर्वींच तिचें लग्न झालें होतें. तिला पुढें शिक्षण घ्यायचें होतें. आणि विवाहाची कल्पना तिला पसंत नव्हती. पण चुलता-चुलतीचें मन मोडणें नको म्हणून तिनें संमति दिली. तिचा जोडी-दार सुंदर, सडपातळ, तिच्यापेक्षां थोडा मोठा, असा होता. त्याच्या प्रथम-दर्शनानें ती सानंद स्तिमित झाली. तिच्या सभय दृष्टीला आपल्या मन-मोकळ्या व सस्नेह हास्यानें प्रत्युत्तर देऊन त्यानें हिचें हृदय जिंकलें. लग्न झालें आणि एक वर्ष चित्रानें वैवाहिक आयुष्य फार सुखांत काढलें. नंतर १९३० च्या कायदेभंगाच्या चळवळीनें सर्व देश खडबडून जागा झाला. चित्रा आणि तिचा पति गिरीश दोघांनींहि कायदेभंगांत उडी घेतली आणि आपापल्या क्षेत्रांत त्यांनीं अविश्रांत काम केलें. तो खेड्यांत व्याख्याना-करितां जाई. हीहि त्याच्याबरोबर असे. ती स्त्रियांपुढें व्याख्यानें देई, आणि अहिंसा-तत्त्वाचा प्रसार करी. एके दिवशीं झुंजुमुंजु होण्याच्या आंत पोलिस आले आणि त्यानीं गिरीशाला पकडलें. चित्रा एकटीच राहिली. तिनें अधिक उत्साहानें या कामांत लक्ष घातलें. एके दिवशीं तिच्या सहकारिणीं-सह तिलाहि पकडण्यांत आलें. गिरीशाच्या अटकेनंतर चित्राला आपण गरोदर असल्याचें आढळून आलें. पण भोंवतालच्या प्रक्षुब्ध वातावरणांत हें ती विसरली होती. अखेर जेलमध्यें आल्यानंतर या गोष्टीबद्दल ती विचार करूं लागली. काय करावें, कोणास सांगावें ? सध्यां तरी हें गुप्तच ठेवावें असें तिनें ठरविलें. उगीच इतरजणी गाजावजा करावयाच्या. दिवसामागून दिवस चालले. जेलच्या कंटाळवाण्या जीवनांत बदल होण्यासारखें कांहीं नाहीं. राजबंदी स्त्रिया लिहीत, वाचीत आणि भवितव्याची चर्चा करीत. दिवस गेले, आठवडे गेले, महिने संपले. कित्येकदां स्त्रियांना पूर्ण समाधान व स्वास्थ्य वाटे; कित्येकदां एकटेपणानें त्यांचा धीर सुटे; लाठ्या किंवा

गोळ्या सहन करण्यासाठीं तुरुंगांत किंवा तुरुंगाबाहेर बाहेर सोडून आलेल्या सुहृदांची त्यांना आठवण होई. कारण हेंच सत्र त्या वेळीं चालू होतें.

जेलमधील जीवनांत पंधरवड्यानें येणारीं पत्रें व मिळणाऱ्या मुलाखती हींच काय तीं आनंदाचीं साधनें असत. पण मुलाखतीहि क्वचितच होत. कारण जीं माणसें मुलाखतीला यायचीं, तींच मुळीं तुरुंगांत अडकलीं जात. चित्राच्या मुलाखतीस कुणी येऊं शकत नसे. चुलता-चुलती यांना इतका लांब प्रवास करणें शक्य नव्हतें. आणि गिरीश तुरुंगांत अडकलेला; पण गिरीशाच्या पत्राकडे ती मोठ्या आशेनें डोळे लावून बसे. दर वेळीं त्याचें पत्र आलें कीं तिला नवीन चैतन्य व जीवन मिळाल्यासारखें वाटे.

एके दिवशीं चित्रा एका आठवड्याचें जुनें वर्तमानपत्र चाळीत होती. मृदुहृदयी मेंट्रननें केव्हां तरी तें तुरुंगांत गुपचुप आणलें असावें. त्या वृत्तपत्रांत चित्राला पतीचें नांव ठळक अक्षरांत दिसलें. "**बी. बॉंब खटल्यांत गिरीशचंद्र.**" धडधडत्या हृदयानें आणि गुदमरलेल्या भावनेनें चित्रा वाचूं लागली. एका बॉंबच्या खटल्यांत गिरीशचें नांव आरोपी म्हणून गोवण्यांत आलें होतें आणि आणि खटला चालला होता त्या गांवीं त्यास नेण्यांत आलें होतें. आपण काय वाचतों आहोंत हें समजावून घेतांना चित्राचें मन गोंधळून गेलें होतें. पण हें कसें शक्य आहे ? गिरीश अहिंसेचा निःसीम उपासक होता. हिंसात्मक मार्गाचा तो नेहमीं तिरस्कार करी. कांहीं तरी चूक असली पाहिजे—तिला निश्चित वाटत होतें. गिरीश हिंसात्मक कटांत सामील नाहीं हें सिद्ध करण्याचा मार्ग ती उत्कटतेनें शोधूं लागली, पण कांहींच जुळेना. निराशेच्या आवेगांत ती कुणाला तरी सल्ला विचारावा म्हणून उषादेवीकडे गेली. उषादेवी त्या सर्वांत मोठ्या होत्या आणि त्यांची सल्लामसलत सर्वजणी घेत. "मासीजी, तुम्ही हें वर्तमानपत्र पाहिलंत का ?" आपल्या डोळ्यांतील अश्रू आणि आवाजांतील कंप लपविण्याचा निष्फळ प्रयत्न करीत चित्रा म्हणाली, "गिरीशासंबंधीं मजकूर आहे. तो बी. बॉंब केसमध्यें आरोपी आहे म्हणतात. मासीजी, हें कसं शक्य आहे ?"

"शांत हो मुली." उषादेवी म्हणाल्या, "तुझ्या हातीं वर्तमानपत्र पडण्यापूर्वींच मीं ती बातमी वाचली होती आणि तुला ती कळूं नये असंच मला

वाटत होतं. ती खरी आहे असं मला वाटतं आणि तुलाही तें पटेल. पण सरकारनं आपल्याशीं डोळ्यांला डोळा भिडवून पाहावं असं सामर्थ्य आपणांत नाहीं. त्यांचे कांहीं स्वतंत्रच मार्ग आहेत आणि कुठलंहि तर्कशास्त्र त्यांच्यापुढं चालत नाहीं. या तुरुंगाच्या भिंतीआडून तूं काय करूं शकणार आहेस? कांहींच नाहीं. हें खोटं ठरावं अशी देवाची प्रार्थना कर, स्वस्थ रहा. माझी खात्री आहे, गिरीशाचा यांत संबंध नाहीं हें त्यांना कळून येईल."

' तो माझं सर्वस्व आहे. त्याला मदत केली पाहिजे. निदान तसा प्रयत्न तरी केला पाहिजे." ढसढसा रडत चित्रा म्हणाली. बिचाऱ्या चित्रेचे कांहीं दिवस उत्कट चिंतेंत गेले. नेहमीप्रमाणें सोमवार आला; दर सोमवारीं जेलचा मुख्याधिकारी स्त्रियांच्या तुरुंगाची तपासणी करण्यास येई. चित्रानें आज त्याच्याशीं वरील विषयासंबंधीं बोलायचें ठरविलें होतें. अगदीं सकाळपासून खूप गडबड चालू होती. तपासणीच्या वेळीं दाखविण्याकरतां प्रत्येक वस्तू शक्य तितकी घांसून पुसून स्वच्छ करण्यांत येत होती. सर्व गुन्हेगार कैदी स्त्रियांनीं या वेळेकरितां खास वापरण्यांत येणारे स्वच्छ कपडे घालून माना खालीं घालून बसावयाचें होतें; त्यांचीं तीं चकचकणारीं लोखंडी भांडीं पुढें घेऊन त्यांनीं बसावें असा हुकूम होता. त्यांचीं नोंदकार्डें दोन्ही हातांत धरलेल्या भांड्यावर त्यांनीं ठेवायचीं. सुपरिंटेंडंटला वाटलें तर एकाद्या कार्डावर तो दृष्टिक्षेप करी. त्यांनीं शक्य तेवढी दास्यवृत्ति दाखवायची आणि देवाच्या दुनयेंतले नीचांतले नीच प्राणी आपण आहोंत असें भासवायचें. एकादी स्त्री जरा ताठ बसली किंवा एवढी दास्यवृत्ति दाखवायचें तिनें नाकारलें कीं अधिकारी स्त्री किंवा वॉर्डर बाया यांपैकीं कुणाच्या तरी हातांतील वेत निष्ठुरपणें बसलाच तिच्या पाठीवर !

**क** वर्गांत टाकलेल्या राजबंदिनी वगळल्या तर **अ** आणि **ब** वर्गांतल्या राजबंदिनींना वरीलप्रमाणें रांगेंत बसावें लागत नसे. **क** वर्गांत राजबंदिनींना ठेवायचें नाहीं असा साधारण नियम होता. तरी कांहीं स्त्रियांना **क** वर्ग मिळे. या तपासणीच्या कवायतीचे वेळीं **ब** आणि **क** वर्गांच्या राजबंदिनी आपापल्या कोठड्यांत किंवा आवारांत असत. मुख्याधिकारी आंत आला तरच त्या त्याला उलट अभिवादन करीत; नाहीं तर त्या त्याची उपेक्षा करीत.

चित्रानें या अधिकाऱ्याशीं बोलण्याचा निर्धार केला. त्या दिवशीं सहज तो आंत आला आणि आपलें नेहमींचें उल्हसित स्मित चेहऱ्यावर आणून म्हणाला, "नमस्ते, भगिनींनो! सर्व ठीक आहे ना? आनंदी आहांत ना अगदीं? कांहीं तक्रार?" साधारणतः प्रत्युत्तर देण्याची कुणी तसदी घेत नसत. कारण तक्रारी क्वचितच दूर केल्या जायच्या! शिवाय त्याच्या त्या उडत उडत विचारलेल्या प्रश्नांनीं राजबंदिनी त्रस्त होत आणि त्याच्याशीं संभाषण करावें असें कुणाला वाटत नसे. अंगीं मुर्दाडपणा असूनहि हा अधिकारी भेकड होता. राजबंद्यांना विशेषतः राजबंदिनींना तो फार घाबरून असे. त्यांच्याशीं युक्तिवाद करणें त्याला आवडत नसे. कारण याचा शेवट अखेर निश्चितपणें कडवटपणांत होई आणि त्याला स्वतःला राजबंदिनींचे प्रश्न सोडवितां न येऊन वरिष्ठ अधिकाऱ्यांकडे पुष्कळ पत्र-व्यवहार त्याला करावा लागे. तो आपले नेहमींचे प्रश्न विचारी आणि कुणी बोलण्याचा प्रयत्न करण्याच्या आंतच माघार घेई. पण त्या दिवशीं चित्रानें त्याला अडविलें आणि म्हटलें,

"मला असं कळतं, बी. बॉंब् केसमध्यें माझ्या पतींना एक आरोपी म्हणून गोवण्यांत आलं आहे. माझी खात्री आहे कीं कांहीं तरी चुकीमुळं त्यांचं नांव त्यांत गुंतलं असावं. कारण असल्या मार्गावर त्यांचा कधींच विश्वास नव्हता. हें कसं काय झालं हें कळून घेण्याकरितां मला त्यांना भेटण्याची परवानगी पाहिजे आहे. माझ्या पतींना ठेवलं आहे त्या जेल-मध्यें मला बदलतील असं वाटतं का तुम्हांला? मला माझ्या पतींना भेटायाचं आहे असं कृपा करून अधिकाऱ्यांना कळवा. माझी खात्री आहे कीं कांहीं तरी भयंकर घोटाळा आहे. ते मला भेटल्यावर सांगतीलच."

"ठीक." अधिकारी म्हणाला, "ही तर नेहमींचीच मागणी असते म्हणा. पण कांहीं करतां आलं तर पाहीन मी." एवढें बोलून चटकन् तो त्या आवाराच्या बाहेर पडला. तपासणीसाठीं जुटीनें एकत्र झालेल्या त्या बंदी स्त्रियांच्या थव्याकडे त्यानें लक्षहि दिलें नाहीं.

आपणाला तुरुंगांतून हलविण्यांत येईल याविषयीं मोठ्या औत्सुक्यानें चित्रा दिवसेंदिवस वाट पाहत होती. पण नोकरशाहीच्या चक्रांतून एखादी

गोष्ट सावकाशीनें होत राहते. घाईचें कारणच नसतें मुळीं. तरी एके दिवशीं चित्राला बदली मिळाल्याचें सांगण्यांत आलें. तिला हर्षवायु झाला. आपल्या कपड्यांची बांधाबांध करीत दिवसभर ती नाचत होती नुसती. बरोबरीच्या स्त्रियांना तिच्या जाण्यानें बरें वाटत नव्हतें. चित्रा तरुण होती आणि तिला अज्ञात स्थळीं नेण्यांत यावें याविषयीं त्यांना भीति वाटत होती. कारण जेलमध्यें मुलींना छळल्याच्या व वाईट प्रकारें वागविल्याच्या भयंकर गोष्टी त्यांनीं ऐकल्या होत्या. कुणी तरी वडिलधारी राजबंदिनी चित्राबरोबर पाठराखीण म्हणून असावी अशा तऱ्हेची विनंति त्यांनीं जेलच्या मुख्याला केली. पण ती मान्य करण्यांत आली नाहीं. चित्राला मात्र मुळींच भीति वाटत नव्हती. पुढले बेत रचण्यांत ती दंग होती.

दुसरे दिवशीं अगदीं सकाळीं अधिकारी बाई नेहमींप्रमाणें गर्जना करीत आंत आली. ती आज चित्राला घेऊन जाणार होती. सर्वांचा निरोप घेऊन झाल्यावर उषादेवीजवळ जाऊन चित्रा त्यांना हलकेंच म्हणाली, "मी तुम्हांला सांगितलं नाहीं. पण मला लौकरच मूल होणार आहे. अर्थात् मी परत इथं तुमच्यांत येणारच आहें, तेव्हां मला काळजी वाटत नाहीं. जेलमध्यें माझा मुलगा जन्माला येऊन तो श्रीकृष्णाचा अवतार ठरो. मी खूप लठ्ठ असल्यामुळं तुमच्या कुणाच्या लक्षांत आलं नाहीं. नमस्ते." या वार्तेनें चकित झालेल्या उषादेवी कांहीं बोलणार तों अधिकारी स्त्रीबरोबर चित्रा दिसेनाशी झाली आणि जेलचीं कवाडें बंद झालीं.

आश्चर्याचा भर ओसरतांच उषादेवींनीं ही वार्ता सर्वांना सांगितली. सर्वजणी थक्कच झाल्या आणि मग स्वभावानुसार गेल्या कांहीं महिन्यांत चित्रांत कोणकोणते फरक झालेले दिसले हें शोधूं लागल्या. ती लठ्ठच झाली, इतरांपेक्षां तिचा आहार जास्त असे, चालतांना तिचें पाऊल जड पडे, आणि पहिल्यासारखी ती पळत नसे, अशा अनेक गोष्टी आतां त्यांना आठवूं लागल्या. पण या साऱ्या निरीक्षणाचा कांहीं उपयोग नव्हता. पाठराखणीशिवाय चित्रानें जाऊं नये, इतकेंच नव्हे, तर तिची ताबडतोब मुक्तता व्हावी यासाठीं कांहीं करणें अवश्य होतें. उषादेवींनीं मुख्याधिकाऱ्याला चिठी लिहिली आणि एका पहारेकरिणीला ती ताबडतोब घेऊन जाण्यास

सांगितलें. पण आपल्यासारख्याच राजबंदिनी या कैदी आहेत असें पहारेकरणी मानीत आणि राजबंदिनींचें काम त्या करीत नसत. या विशिष्ट पहारेकरणीला तर त्यांच्याविरुद्ध अढीच होती. ती रेंगाळत उशीरा कशीबशी कचेरीपर्यंत गेली. पण तोंवर चित्रा निघून गेली होती आणि अधिकारीहि घरीं गेला होता.

सायंकाळीं मेट्रन तपासणीला आली तेव्हां तिनें हें सर्व सांगितलें. आपणापकीं कुणाला तरी जेलच्या मुख्याधिकाऱ्याला भेटूं द्या अशी त्यांनीं बाईस विनंति केली; पण तें शक्य नाहीं असें तिनें सांगितलें. "हें त्यांचं त्यांना निस्तरूं द्या. आपण कशाला त्रास घ्यायचा?" ती म्हणाली. असें एकंदरीनें झालें. चित्राच्या मैत्रिणी खवळल्या. पण जेलमध्यें कांहीं करणें अशक्य आहे हें कळून त्या स्तब्ध बसल्या. दैवांत असेल तें घडेल, प्रसूतिपूर्वी कांहीं चमत्कार होऊन ती बाहेर पडली तर पाहायचें असा आशादायक विचार त्या करूं लागल्या. पण जेलमध्यें असे चमत्कार घडत नसतात!

एक पहारेकरी आणि दोन पहारेकरणी यांच्या देखरेखीखालीं एका इंटर वर्गाच्या डब्यांतून चित्रा प्रवास करीत होती. डब्यांत गर्दी होती. चित्राला मजा वाटत होती.गिरीशाच्या भेटीची उत्कण्ठा तिला लागली होती. तिला खात्री वाटे कीं गिरीशाचा दहशतवादी चळवळीशीं कांहीं संबंध नाहीं हें आपण अधिकाऱ्यांना पटवून देऊं आणि त्यांनीं ठेवलेला आरोप खोटा आहे हें सहज सिद्ध करूं. आणि कदाचित् आपणा स्वतःकरितां असें सांगणें त्याला कमीपणाचें वाटत असेल; पण आपल्याकरितां तो खास हा बचाव करील.

ती रेंगाळत जाणारी पॅसेंजर गाडी बारक्यासारक्या स्टेशनवर थांबायची. चित्राचा जीव अस्वस्थ होई. फ्. गड जातांना लागणारीं तर हीं स्टेशनें दिसेनात. पहारेकरणींना तिनें विचारलें, पण त्यांनीं खांदे उडविले आणि उत्तरच दिलें नाहीं. यामुळें साशंक होऊन चित्रानें आपणास त्या कुठें नेत आहेत असें विचारलें, आणि एकजण मोठ्या नाखुषीनें म्हणाली, "स्. गडला." "पण मला तिकडे न्यायचं नव्हतं. तुमची कांहीं तरी चूक होत

आहे. पागल!" चित्रा बेभानपणें ओरडली, " मी इथंच उतरेन. अशी गाढवासारखी चूक कशी केलीत ग ?" आणि ती स्फुंदत दाराकडे धांवत गेली; पण पहारेकरिणींनीं तिला हातांना धरून खेचलें आणि जागेवर नेऊन बसविलें. चित्रानें प्रतिकार केला तेव्हां पहारेकरिणींनीं तिच्या तोंडांत मारली. या हल्ल्यानें बधिर होऊन चित्रा कोपऱ्यांत बसली आणि मुक्कामाचें स्टेशन येईपर्यंत जागची हलली नाहीं.

मग उतरण्याचा हुकूम होतांच मोठ्या जड पावलांनीं ती खालीं आली व जेलची मोटर तिच्यासाठीं तयारच ठेवली होती. हिंदुस्थानांतील अत्यंत वाईट तुरुंगांकडे तिला आतां जावें लागणार होतें. तुरुंग दिसूं लागला. पूर्वीच्या तुरुंगापेक्षां तो फार लहान आहे असें चित्राला आढळून आलें. पण तो फार भेसूर दिसे. तिचा धीर सुटला. पण गिरीशची भेट होणार या विचारानें ती थोडी उल्हसित झाली. कारण आतां गिरीश भेटणार याची खात्रीच होती तिला.

चित्रानें जेव्हां आपल्या एकाकी कोठडींत प्रवेश केला, तेव्हां रात्र झाली होती. अंधार मी म्हणत होता. तिच्या बरोबरच्या सामानाची तपासणी झाली. मुख्य अधिकारी बाई तिच्याबरोबर होती. पण तिचें तोंड चित्राकडे नसल्यामुळें चित्रा तिला नीट पाहूं शकली नाहीं. तिच्या कोठडीला बाई कुलुप घालीत असतां चित्रानें या ठिकाणीं राजबंदिनी किती आहेत म्हणून विचारलें. 'एकहि नाहीं.' असा उद्धटपणाचा जबाब तिला मिळाला. " मग मला कां इथं ठेवण्यांत आलं आहे ? मी राजबंदिनी आहें; उद्यां मी सुपरिंटेंडंटला भेटूं शकेन काय, बाई ?" चित्रानें विचारलें.

या वेळीं त्या बाईनें पहिल्याप्रमाणेंच चित्राकडे पाहिलें. चित्राची भीतीनें दामटीच वळली! तांबडे लाल डोळे, देवीचे वण, ओरखडे, आसुरी हास्य–छे! पाहिल्याबरोबर माणसाचें रक्त गोठूनच जायचें! " नाहीं छबकडे! सुपरिंटेंडंटला तुला भेटतां येणार नाहीं. अशी कोण आहेस तूं म्हणून तुझ्या इच्छेला येईल तेव्हां सुपरिंटेंडंटनीं तुला भेटावें ? त्यांना वेळ असेल आणि त्यांना तुला भेटावेंसें वाटेल तेव्हांच तुला ते भेटतील. तोंवर तूं ठीक वागशील तर मजेंत राहतां येईल. तुझ्यासारख्या छबकड्या

पोरी फार आवडतात मला. बहुतेक थेरड्याच येतात इथं. पण मला त्रास देशील तर तुझ्या या कोवळ्या शरीरांतलें हाडानूहाड मोडून टाकीन. ध्यानांत ठेव!"

जें पाहिलें आणि ऐकलें त्यानें दबकून जाऊन चित्रा त्या कैदासिणी-पासून दूर कोंपऱ्यांत जाऊन उभी राहिली. पण ती बाई आंत आली आणि चित्राच्या पाठीवर हात ठेवीत म्हणाली, " घाबरूं नको, पोरी; मी प्रसंगीं निष्ठुर होऊं शकतें. पण आज्ञाधारक मुलीशीं मी फार प्रेमळपणें वागतें.तूं मला आवडली आहेस. माझ्या म्हणण्याप्रमाणं वागशील तर कांहीं त्रास होणार नाहीं तुला." चित्राच्या यौवनपूर्ण शरीराकडे आपादमस्तक तिनें पाहिलें. पण चित्रा भीतीनें अर्धमेली होऊन दूर गेली होती. तिला अशी भेदरलेली पाहून ती बाई खदखदां हंसली आणि खिदळत बाहेर गेली. पहारेकरिणींना कोठडीचें कुलुप लावण्यास तिनें जातांना सांगितलें.

आठवडा गेला. सुपरिंटेंडंट आला नाहीं. गिरीशाचीहि वार्ता कांहीं कळली नाहीं. नंतर एके दिवशीं सकाळीं कचेरींतून बोलावणें आलें आणि चित्राला तिकडे नेण्यांत आलें. कचेरींत तीन चार माणसें खुर्चीवर बसलेलीं तिला आढळलीं. चित्रा आंत जातांच सुपरिंटेंडंटनें तिला एका रिकाम्या खुर्चीवर बसण्यास सांगितलें. कांहीं वेळानें सुपरिंटेंडंट म्हणाला, " हे सद्-गृहस्थ, तुझ्या नवऱ्याविषयीं तुला कांहीं प्रश्न विचारणार आहेत. त्याचे काय उद्योग होते, त्याचे मित्र कोण होते, तो काय काम करीत असे, हें तूं त्यांना सांगावंस. तुझ्या नवऱ्याला याबद्दल विचारलं; पण तो कांहींच उत्तर देत नाहीं."

" माझे पति कुठं आहेत?" चित्रानें विचारलें, " मला वाटलं, ते मला इथं भेटतील."

" अर्रर्र! वाईट वाटतं मला!" सुपरिंटेंडंट म्हणाला, " समजुतीचा घोटाळा झाला कांहीं तरी. तुझा नवरा या तुरुंगांत नाहीं.पण तूं जर त्याच्या चळवळीविषयींची सर्व माहिती सांगितलीस,तर त्याला इथं आणतां येईल."

" पण सांगण्यासारखं आहेच काय मुळीं?" चित्रा म्हणाली, " तो एक कॉंग्रेस कार्यकर्ता व सत्याग्रही होता. इतर शेंकडों कार्यकर्ते जें करीत, तेंच

त्यानं केलं. तुम्ही मला हे प्रश्न कशाला विचारतां ? माझ्याकडून काय काढून घेणार आहां ? गिरीश हिंसेचा द्वेष करी. नेहमीं नेहमीं तो हिंसेच्या विरुद्ध असे. रक्तपात आणि हिंसा यांत गुंतलेल्या लोकांशीं तो संबंध ठेवीत नसे. कित्येकदां त्याचे मित्र आणि इतर मंडळी त्याच्याशीं अहिंसेच्या फोलपणाबद्दल चर्चा करीत. तो मोठ्यानं हंसे, इतकंच. त्याचा त्या मंडळीवर केव्हांच विश्वास बसला नाहीं. मी त्याला भेटूं इच्छितें याचं हेंच कारण. या मंडळींत तो कसा आला आणि कोणी त्याला यांत गुंतवलं हें मला त्याला तुमच्यासमक्ष विचारायचं आहे. तो माझ्याशीं खोटं बोलणार नाहीं आणि आपणाला अन्यायानं कसं आरोपी केलं हें तो तुम्हांला सांगेल."

"तुम्ही म्हणतां तुमच्या पतीचे मित्र त्याला हिंसात्मक चळवळींत ओढण्याचा प्रयत्न करीत." एका सी. आय्. डी. अधिकाऱ्यानें विचारलें, "या तरुण मंडळींचीं नांवं काय ?"

"तुम्हांला माझ्याकडून काय काढायचं आहे ?" चित्रा रागानें म्हणाली, "मी तुम्हांला नांवं सांगणार नाहीं. हीं मुलं जगांतल्या हरएक गोष्टीवर चर्चा करीत. अहिंसा हा त्यांपैकींच एक विषय होता. मीसुद्धां त्यांच्याशीं चर्चा करीत असें. याचा अर्थ आम्ही कांहीं कट करीत होतों असा होत नाहीं. तुम्ही मला इथं काय उलटतपासणी करण्याकरितां आणलं आहे ? असं असेल तर तुम्ही आपला वेळ व्यर्थ दवडीत आहां."

"तुमच्या मित्रांचीं नांवं सांगा म्हणजे तुमची व तुमच्या पतीची गांठ घालून देतों." एक पोलिस अधिकारी बोलला, "हें तुम्हीं नाकारलें तर एकांतांतल्या कोठडींत तुम्हांला ठेवण्यांत येईल आणि आमचं म्हणणं ऐकेपर्यंत तुम्हांला तिथंच राहावं लागेल; कळलं ?" आणि नंतर त्यानं मेट्रनकडे वळून चित्राला घेऊन जाण्यास फर्मावलें. "मेट्रन ! तुमचे सारे समजुतीचे उपाय योजून हिला बोलकी करा." असें जेलच्या मुख्य अधिकाऱ्यानें तिला सांगितलें. याचा चेहरा त्या स्त्रीइतका भयंकर नसला, तरी कपटी आणि क्रूर होता.

चित्रा गोंधळलेल्या परिस्थितींत कोठडीकडे गेली. तिला अशक्तता वाटूं लागली. आणि पोटांतलें मूल जड झालें आहे असें वाटून तिला

अस्वस्थता वाटूं लागली. तिचें मन बावरलें आणि विचारांचा गोंधळ उडाला. हे सर्व प्रश्न या लोकांनीं कशाकरितां विचारले असावेत? ती आश्चर्य करूं लागली. कशाची कबुली द्यायची? कबुली देण्यासारखें आहेच काय मुळीं? आणि गिरीश—त्याची हकीकत काय असेल? त्याचा छळ करीत असतील काय? गिरीशचा बी. बॅांब कटाशीं संबंध नाहीं हें तिला ठाऊक होतें. पण तिला हेंहि ठाऊक होतें कीं कितीहि जुलूम जबरदस्ती करून त्याच्याकडून माहिती काढण्याचा प्रयत्न झाला, तरी हवे ते हाल सहन करील, पण गिरीश तोंडांतून शब्द काढणार नाहीं. आपल्या कोठडींतल्या गार जमिनीवर तिनें अंग टाकलें आणि जरा बरें वाटावें व झोंप यावी अशी प्रार्थना केली. पण तिला झोंप आली नाहीं; आणि तळमळत तिला पडावें लागलें. नंतर ती उठून बसली आणि शून्य मनानें बाहेर पाहूं लागली.

अलीकडे बरेच दिवस मुलाचें ओझें तिला जास्त वाटूं लागलें होतें. ती चांगली गर्भमंथर दिसे; पण तिकडे कोणी लक्ष दिलें नाहीं. कांहीं झालें तरी तिला वाटे कीं लवकरच हें गूढ त्यांना कळेल आणि आपली मुक्तता झाली नाहीं तरी आपल्या मैत्रिणीकडे परत आपणाला जायला मिळेल. एक आठवडा गेला. मेट्रननें चित्राशीं बोलण्याचे पुष्कळ प्रयत्न केले. पण ती तिच्या कोठडींत जात नसे. ती फार गोड आणि लाघवी भाषण करी. पण चित्रा तिला उत्तर देत नसे.

चित्राला नेहमींच कोंडून ठेवण्यांत येई. दिवसांतून चार वेळ दहा पांच मिनिटें जरा अंग मोकळें करण्याकरतां तिला सोडण्यांत येई, एवढेंच. एके दिवशीं रात्रीं जेल बंद झाल्यानंतर बाहेरचें फाटक उघडल्याचा आवाज आला. तिला वाटलें कोणी नवीन कैदी आली असावी. तिनें भिंतीकडे तोंड फिरविलें. पण पावलांचा आवाज हळूहळू जवळ आला. अगदीं कोठडीपर्यंत कुणी तरी थांबल्यासारखें वाटलें. चित्रा चटकन् उठली; अर्धवट घाबरली होती ती. पण कांहीं बातमी आणली असेल अशीहि तिची अपेक्षा होती. कुलुप उघडलें. ती पूर्वीची मेट्रन आंत आली. आणि तिनें येतांना पुनः कुलुप लावून घेतलें. ती चित्राजवळ बसली

आणि तिच्या केसावरून हात फिरवीत म्हणाली, " पोरी, तुला एकलकोंडं वाटत असेल म्हणून तुझ्या सोबतीला आल्यें मी. घाबरूं नको. जवळ ये, माझ्याशेजारीं बैस म्हणजे आपण बोलूं. " घाबरलेली आणि भ्यालेली चित्रा दूर सरली. पण मेट्रननें जबरदस्त मिठी मारून तिला आपल्या शरीराशीं कवटाळलें. हालचाल करण्यास किंवा बोलण्यास चित्राला भान नव्हतें. तिच्या स्तब्धतेचा अर्थ आपल्याला करण्यास तिची संमति आहे असा घेऊन मेट्रननें आपले रुक्ष हात त्या युवतीच्या खांद्यावरून व उरोभागावरून फिरवण्यास सुरुवात केली. या वेळीं ती गोडगोड शब्दानें बोलत होती. " तूं इतकी तरुण फुलासारखी आहेस; पण या तुझ्या नाजुक देहांत किती शक्ति आहे ! तूं थोडीशी लठ्ठ आहेस, पण मला तूं फार आवडतेस. माझ्याशीं नीट वाग, मीं तुला सुखी करीन. आपण मैत्रिणी झालों कीं तुझा सगळा त्रास संपलाच म्हणून समज. ये माझ्या मांडीवर आणि—"

कांहीं अनिर्वचनीय तिटकारा वाटून मेट्रनच्या मिठींतून सोडवीत चित्रा म्हणाली, " मला स्पर्श करूं नकोस. पाजी कुठली ! इतकं पाप करवतं कसं तुला ! तुझ्या सुखासाठीं आणि चैनीसाठीं वापरल्या जाणाऱ्या गुन्हेगार कैद्यांपैकीं मीं नाहीं. मी राजबंदिनी आहें. आणि तूं मला स्पर्श करतां कामा नये. चालती हो. माझ्या खोलीबाहेर नीघ. उद्यां मी हें सर्व सुपरिंटेंडंटना सांगेन. "

आपलें अवजड शरीर कसें तरी सांवरीत चित्राच्या थरथरत्या शरीरयष्टीपुढें मेट्रन उभी राहिली आणि चित्राच्या तोंडावर, छातीवर वाटेल त्या ठिकाणीं तिनें तडाखे लगावले. " अग छबकडे ! माझा रिपोर्ट करणार काय तूं ? तूं राजबंदिनी आहेस म्हणूनच माझ्यापुढं तुझा टेंभा ? बघूं या काय होतं तें. मी तुला सुपरिंटेंडंटला भेटूं देणार नाहीं. मग बघूं काय तूं माझा रिपोर्ट करणार तें ! तुझी माझ्याशीं गांठ आहे. आणि मी तुझा हवा तसा उपयोग करीन. तूं शहाणी असतीस, तर सर्व कांहीं ठीक झालं असतं. पण आतां मला सक्तीचा उपयोग करावा लागणार आहे, बघ. " असें म्हणून तिनें चित्राला जबरदस्त मिठी मारली आणि तिची देहयष्टि अगदीं कुस-

करली. चित्रा ओरडत आणि अर्धवट बेशुद्ध स्थितींत पोटाला हात धरून खालीं पडली.

" काय तुला होतंय् ? " मेट्रननें तिला घाबरून विचारलें आणि तिची साडी दूर केली. नंतर तिचें पुढें आलेलें पोट तिला दिसलें. चित्राला एक सणसणीत लाथ देऊन तिला म्हणाली, " तूं नेहमींच अशी असतेस, कीं गर्भारशी आहेस ? " चित्राच्या तोंडांतून अर्धवट किंचाळत असे शब्द निघाले, " मी गरोदर आहें. "

" असं होय ? मग घे हें—एक, दोन, " असें म्हणत तिनें चित्राला आणखीहि लाथा मारल्या.

" इथं गरोदर स्त्रियांना घेऊन मला वेळ फुकट घालवायचा आहे काय ? तुझं तळपट होवो. " असें ओरडून हातांतल्या छडीनें चित्राच्या तोंडावर, शरीरावर निष्ठुरपणें प्रहार केले. थकून गळून चित्रा पूर्ण बेशुद्ध झाली. आणि जेथें मेट्रनचे कर्कश आवाज व शाप ऐकूं येणार नाहींत, अशा बेशुद्धीच्या अवस्थेंत पोंचली !

चित्रा बेशुद्ध झालेली पाहतांच मेट्रन जरा घाबरली. तिनें मोठ्यानें ओरडून, पहारेकरणीला बोलावून घेतलें आणि बादलीभर पाणी आणण्यास सांगितलें. तें पाणी चित्रावर ओतून त्या पहारेकरणीसह ती निघून गेली. आतां चित्रा शुद्धीवर येईल तेव्हां येवो असें त्यांनीं ठरविलें. कित्येक तास चित्रा थंड गोळा होऊन पडली होती. पहांटे पहांटे तिला शुद्ध आली. अंग ठणकत होतें. आणि तेवढ्यांत शरीर हालवून सोडणाऱ्या वेणा एकसारख्या येऊं लागल्या. पहिल्यानें तिला कळलें नाहीं; पण नंतर तिच्या लक्षांत आलें कीं या प्रसूतिवेदना आहेत आणि प्रसूतिकालापूर्वी दोन महिने अगोदर त्या सुरू झाल्या आहेत. ती घाबरली. तिला काय करावें हें सुचेना. पहारेकरणींना मोठ्यानें ओरडून ती बोलावूं लागली. पण कोणी आलें नाहीं ! इतरहि कैदी स्त्रिया तिच्या ओरडण्यानें हालल्या नाहींत. तो तुरुंग स्मशानवत् झाला होता. जिवंत माणसाचा स्वर कुठें ऐकूं येत नव्हता. यातना–वेदनांनीं व्यापलेली चित्रा कोठडीचे गज धरून आपल्या तोंडांतून

निघणाऱ्या किंचाळ्या कशा तरी आवरत होती. वेदना अधिकाधिक लवकर येऊं लागल्या. आणि चित्राला वाटलें. आतां कुठल्याहि क्षणीं आपला जीव जाणार. इतक्यांत एक प्रचंड कळ आली, आणि शरीर फुटतें कीं काय असें झालें. एक भयंकर किंचाळी तिने दिली. गजाचे हात सुटले आणि ती बेशुद्ध झाली. नंतर दुःखमुक्त होऊन तिला जेव्हां जागृति आली, तेव्हां तिला कांहीं आठवेना. मग तिला कळलें, आपल्याला मूल झालें असलें पाहिजे. तिचा प्रत्येक अवयव दुखत होता. भयंकर अशक्तता वाटत होती. तशीच ती उठली आणि कोपरे टेकून पाहूं लागली; तों शेजारीं एक मासांचा गोळा तिला दिसला. आपला अशक्तपणा विसरून ती त्याच्या जवळ गेली आणि तिनें पाहिलें तों नाळ अजून तसाच होता. तिनें चहूंकडे पाहिलें; पण कापायला कांहींच दिसलें नाहीं. मग तिची आपल्याकडे दृष्टि गेली. एक बांगडी फोडून तिनं नाळ कापला. पण बाळाचा ऋणानुबंध फार चिवट होता; कारण तो लवकर कापला जाईना. नाळ कापल्यानंतर तिनें तें मूल उचललें. आपल्या साडीनें तें स्वच्छ केलें. पण तें कांहीं आवाज करीना. तिला एक प्रकारची विचित्र भीति वाटूं लागली. आणि तिनें त्याच्या पाठीवरून हात फिरविला. आपल्या काकीचें मूल जन्माला येतांच परिचारिकेनें असेंच केल्याचें तिनें पाहिलें होतें. पण तरी आवाज येईना. नंतर तिला वस्तुस्थिति कळून चुकली. या घाणेरड्या तुरुंगांत जन्मलेलें मूल जन्मतःच मेलें होतें. कुठलीहि शुश्रूषा किंवा औषधपाणी न मिळाल्यानें त्याचा अंत झाला होता. आपणहि मरणार काय? ती विचार करूं लागली. इतकी अशक्तता वाटत होती तिला! आपल्या मुलाला घट्ट धरून भोंवतालच्या रक्ताळलेल्या जागेपासून थोडें दूर एका कोपऱ्यांत ती बसली होती. डोक्यांत गोंधळ होता. डोळ्यांत अश्रू नव्हते. नुकत्याच घनघोर सोसाव्या लागलेल्या यातनांमुळें ती पुनः बेशुद्ध झाली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं तिला खूप ताप चढला, वात झाला. अशाहि स्थितींत आपल्या नूतन अर्भकाला तिनें छातीशीं घट्ट धरलें होतें.

सर्व जेल भीतीनें हादरून गेला. पण मेट्रनशिवाय खरी परिस्थिति कोणालाच ठाऊक नव्हती. तिला इस्पितळांत नेण्यांत आलें. आणि तिच्या

काका-काकींना तिच्या अकाल प्रसूतीची बातमी कळविण्यांत आली. ते तांतडीनें आले. पण तिची प्रकृति सुधारण्याचीं कांहींच लक्षणें दिसेनात. चित्रानें त्यांना सर्व हकीकत सांगितली. त्यांना धक्का बसला. त्यांनीं सर्व प्रकरणाची चौकशी व्हावी अशी मागणी केली. पण कांहींच झालें नाहीं. कारण हा साधा गर्भपात होता, असें जेलच्या डॉक्टरानें शिफारसपत्र दिलें. चित्रा अनेक आठवडे जीवन-मरणाच्या झगड्यांत होती. आणि एके दिवशीं सकाळीं आपल्या अल्पपरिचित बाळाच्या भेटीकरतां तिचा सौजन्यशील आत्मा तिच्या कुडींतून निघून गेला !

अश्रूंनीं भरलेल्या नेत्रांनीं पोलिस अधिकारी गाडीच्या डब्यासमोर उभा राहिला. आणि डब्यांत कोंपऱ्यामध्यें बसलेल्या एका शुभ्र केसांच्या स्त्रीला त्यानें पकडवॉरंट दाखविलें. तो म्हणाला, "हा दिवस पाहायला मी जगेन असं मला वाटलं नव्हतं. धैर्य असतं तर हा हुकूम मीं अमान्यहि केला असता पण मला माझी नोकरी गमवायची नाहीं. वाटलं तर मला शाप द्या. माझ्या कृत्याबद्दल मला नरकापेक्षांहि दुसरी अधिक वाईट गति मिळाली तरी हें योग्य ठरेल."

वृद्ध स्त्री हंसली आणि वॉरंट परत करीत म्हणाली, "मुला, हा माझ्या जीवनांत अत्यंत अभिमानाचा दिवस आहे. मला वाटलं नव्हतं; इतक्या वृद्धापकाळीं माझ्या देशाची सेवा करण्याचा मान मला मिळेल. माझीं घरां-तील सर्व माणसं तुरुंगांत असतांना मी बाहेर आहें याची मला खंत वाटत असे. आतां पुष्कळ शांत वाटेल. तूं मला पकडलंस याबद्दल तुला मी दुवा देतें. मला सांग, मी इथंच उतरूं? का तूं माझ्याबरोबर येणार ?"

पोलिस अधिकाऱ्यानें प्रणाम केला आणि त्या वृद्ध स्त्रीच्या पायाला स्पर्श केला. "माताजी," तो म्हणाला, "तुम्ही खरोखर दैवी आहांत. प्रणाम असो तुम्हांला. तुम्हांला सी—येथें घेऊन जायचा मला हुकूम आहे. मी शेजारच्या डब्यांत आहें."

× × ×

जेलला भेट द्यायला येणारा पाहुणा कांहीं जेल-अधिकाऱ्यांसह एका लहान कोठडीच्या दाराशीं उभा होता. डोळ्यांसमोर दिसणाऱ्या कांहींशा अपूर्व देखाव्यानें चकितच झाला होता तो! खोलीमध्यें एका लोखंडी खाटेवर एक लहानशी आकृति जुडी करून पडलेली त्याला दिसली. ती कांहीं साध्या

कैद्यांसारखी नव्हती. कोण असावी ती ? तो विचार करूं लागला. जिचे सर्व केंस पिकले आहेत अशी ६४–६५ वर्षांची (अधिकच मोठी असेल कदाचित्) एक वृद्ध स्त्री होती ती. ती गाढ झोंपली होती. आणि तिच्या सुंदर व रेखीव मुद्रेवर अगाध शांति दिसत होती. तो पाहुणा जेलच्या मुख्य अधिकाऱ्याकडे वळला आणि लगेच म्हणाला, "वा: ! कुणाला तुम्ही इथं आणलंय? मला वाटतं, राजबंदिनी असावी ही. पण या वयाला तिला तुरुंगांत आणणं इष्ट आहे काय ? मला वाटतं, आपल्या सरकारला वेड लागलं असावं. कोण आहे ती ? "

" ती, स. ची माता आहे. लोकांना कायदेभंग व असहकारिता शिकवणारीं भाषणं न करण्याबद्दल तिच्यावर नोटिस बजावण्यांत आली होती. पण ती तिनं मानली नाहीं. या वयांत तिनं प्रांतभर दौरा काढला. आणि प्रकृति चांगली नसतां प्रक्षोभक भाषणं केलीं. तिच्या वयाकडे लक्ष देऊन एकदां भाषणबंदीचा हुकूम अमान्य केल्याबद्दल सरकारनं दुर्लक्ष केलं. पण ती जेव्हां वारंवार हुकूम मोडूं लागली, तेव्हां सरकारनं तिच्यावर दुसरा हुकूम बजावला. स्थानिक अधिकाऱ्यांच्या परवानगीशिवाय गांव सोडायचं नाहीं असं त्या हुकुमांत होतं. पण तिच्या वागणुकींत फरक पडला नाहीं. या ठिकाणीं भरणाऱ्या एका राजकीय परिषदेकरितां ती आपला गांव सोडून आली. आज पहांटेच ही इथं आली आहे. हिच्या पुढील व्यवस्थेबद्दल आम्हांला कांहींच हुकूम आले नाहींत."

" वा: !" तो पाहुणा म्हणाला, " तुम्ही तुमच्या सारासार बुद्धीला रजा का दिली आहे ? हिच्या अटकेमुळं अगणित गुंतागुंती होतील हें तुम्हांला कळत नाहीं का ? ही एका सन्मान्य नागरिकाची पत्नी आहे. शिवाय ती अगदीं वृद्ध आणि रुग्ण अशी आहे. ती नेहमीं ऐषआरामांत राहिलेली आणि तुम्ही हिला अशा जागेंत ठेवलं ? कांहीं बरंवाईट घडलं तर मोठी आफत येईल. मी चाललों आतां. जेलचा इतर भाग मी आतां पाहत नाहीं. कारण या प्रकारामुळं मी अगदीं अस्वस्थ झालों आहें. आतां गव्हर्नरला भेटून तुम्ही केलेल्या या घोटाळ्यांतून बाहेर कसं पडायचं हें मला पाहिलं पाहिजे."

तो हें सर्व रागानें बोलत असतां राजबंदिनी जागी झाली. आंथरुणात बसून तिनें भोंवतालच्या मंडळीकडे लक्ष टाकलें. त्या सर्वांनीं तिला सन्मानपूर्वक प्रणाम केला. आणि तो पाहुणा पुढें होऊन तिला जेलमध्यें आणल्याबद्दल तिची मनःपूर्वक क्षमा मागूं लागला.

ती वृद्ध स्त्री हंसली. अंथरुणावरून उठून दारापर्यंत येऊन ती म्हणाली, "मुला, क्षमा कशाला मागतोस तूं ? माझ्याबर हुकूम बजावला तो मीं मोडला. साहजिकच मला पकडणं भाग होतं. मी मुद्दाम हुकूम मोडला. मला ब्रिटिश सरकारची सत्ता अमान्य करायची होती. तूं उगीच कां वाईट वाटून घेतोस ?"

माताजी कोठडीच्या गजाजवळ उभ्या होत्या. त्या झोंपेंत होत्या त्याहून आतां अधिक नाजुक व अधिक कृश दिसत होत्या. "हेंच माझं स्थान आहे." कुणीहि बोलत नव्हतें. माताजीच पुढें बोलूं लागल्या, "तुम्हांला ठाऊक आहे, शेकडों लोक आज तुरुंगांत पिचत आहेत. माझे सर्व कुटुंबीय लोक तुरुंगांत आहेत. मग सरकारचा प्रसाद मलाच तेवढा कां मिळूं नये ? मीहि सत्याग्रही आहें आणि माझं वय अन् अशक्तता विसरून माझ्या प्रिय मातृभूमीकरितां मी यथाशक्ति कांहीं तरी केलं आहे. हिंदुस्थानची सेवा रुजू झाली, हेंच माझं बक्षिस. या तुरुंगांत मी पूर्ण सुखी आहें."

"पण माताजी," तो पाहुणा अधिकच गोंधळून म्हणाला, "या भयंकर जागीं तुम्हीं राहिलेलं आम्हांला सहन होत नाहीं. देशासाठीं सर्वस्वाचा होम करणारीं पुष्कळ माणसं आहेत. तुम्हांला प्रिय असलेले देशाला देऊन शेंकडों लोकांपेक्षां तुम्ही अधिक त्याग केलेला आहे. तुम्ही स्वतःचा होम करण्याचं कारण नाहीं. क्षमा करा. मला गव्हर्नरला भेटून त्याच्या अधिकाऱ्यांनीं काय मूर्खपणा केला हें पटवून दिलं पाहिजे. नमस्ते, माताजी."

"नमस्ते, मुला. माझ्या सुखाकरितां जेवढी काळजी घेतोस तेवढी देशाकरितां घेशील तर किती बरं होईल ! पण तूं तें करूं धजणार नाहींस. आपली नोकरी सोडून सत्याग्रही लोकांच्या मालिकेंत तूं जाऊन मिसळत

नाहींस. कारण पैसा आणि सुरक्षितता तुला प्रिय आहेत. पण यापैकीं कांहींच ज्यांना नको आहे, अशा आम्हां मंडळीची कशाला काळजी करतोस? माझ्याकरितां कसलीच तसदी घेऊं नको. इथल्या माझ्या इतर भगिनीं-सारखेंच मला वागवा."

अस्वस्थ आणि ओशाळल्यासारखें वाटून ती मंडळी झपाट्यानें परतली. ती सर्व मंडळी गेल्यावर राणीदेवी परत आल्या आणि आपल्या बिछान्या-वर बसल्या. आपल्या रिकाम्या खोलींत त्यांनीं चहूंकडे प्रथमच दृष्टिक्षेप केला. दीर्घ प्रवासानंतर त्यांना फार शीण आला होता. थोडा डोळा लागल्या-मुळें त्यांना किंचित् हुशारी वाटत होती. हा तुरुंग तर!–त्यांच्या प्रिय जनांनीं आणि हजारों आबालवृद्ध देशभक्तांनीं ज्याच्या अनेक वाऱ्या केल्या होत्या तोच हा तुरुंग! अखेर येथें येण्याचा आणि देशाची सेवा करण्याचा मान त्यांना मिळाला होता. तिला गरम चहा घ्यायची इच्छा होती. पण जेलमध्यें कुठून चहा मिळणार?

तुरुंग ही अगदीं निवांत जागा असते असें त्यांनीं ऐकलें होतें. पण या विशिष्ट तुरुंगांत मात्र तऱ्हेतऱ्हेच्या आवाजांची गजबज होती. दूर कुठें तरी कैदी स्त्रियांचें भांडण चाललेलें आणि पहारेकरिणी त्यांना शिव्या देत अस-लेल्या ऐकूं येत नव्हत्या. माताजींच्या साठ वर्षांच्या सुखी व सुरक्षित जीवनांत असे अपशब्द त्यांनीं कधीं ऐकले नव्हते.

अखेर मेट्रन सायंकाळचें जेवण घेऊन आली. जेवण म्हणजे काय? एका जुनाट ॲल्युमिनमच्या थाळींत डाळ, भात, आणि कसली तरी न ओळखतां येण्यासारखी भाजी. त्याच्याकडे दृष्टि टाकतांच त्या वृद्ध स्त्रीला कसेंसेंच झालें. त्यांनीं जेवण घेण्याचें नाकारलें आणि एकादा कप चहा मिळेल का म्हणून विचारलें. एवढ्या थोर व्यक्तीच्या सान्निध्यानें आयुष्यांत पहिल्या प्रथमच नमलेली मेट्रन 'हो' म्हणाली आणि त्याप्रमाणें चहा पाठवून दिला. माताजींना चहा घेतल्यावर जरा तरतरी आली आणि आपल्या अंथरुणांत पडून त्या चिंतनांत मग्न झाल्या.

किती महिने तरी त्या घरीं एकट्याच काळ कंठीत होत्या. त्यांच्या घरांतील मंडळी निरनिराळ्या तुरुंगांत खितपत होती. कांहीं जणांच्या आणि

त्यांच्या भेटी झाल्या होत्या. पण पुष्कळांना मुलाखतीची परवानगी नव्हती. या साऱ्या स्वकीयांच्या गैरहजेरीमुळें त्या प्रचंड घरांत प्रत्येक क्षण वैऱ्या-सारखा वाटे त्यांना. सारी जणें जेलमधील कदान्न खात असतां घरीं पुढें येणारें सुग्रास भोजन व ऐषाराम त्यांना नकोसा होई. विचार करा-यला वेळ मिळूं नये म्हणून त्या अष्टौप्रहर कामांत गढून जात. शेजारच्या खेड्यापाड्यांतून सभा, दौरे, मिरवणुका काढण्यांत दिवस कसे तरी जात. पण रात्रीं मात्र असह्य व कंटाळवाण्या होत. कुणी बोला-यला नसल्यामुळें रात्रीचा एकांत फार तापदायक वाटे. तुरुंगांत स्मशान शांतता असते, असें त्यांनीं ऐकलें होतें; पण तें मुळींच बरोबर नव्हतें. रात्रीं निरनिराळे आवाज ऐकूं येत. कांहीं सौम्य व अनपेक्षित, तर कांहीं कठोर व कर्कश. कोपऱ्यांत कसा तरी मिणमिण राहणारा फुटका कंदील भिंतीवर भेसूर छाया पसरवी. अंगाला झोंबणारा गार वारा मात्र शब्द न करतां कोठडींतून जाई. त्याला अडवायला त्या आवारांत झाडेंसुद्धां नव्हतीं.

ती वृद्ध स्त्री अंथरुणांत जुडी करून निजली पण तिला ऊब येणें कांहीं शक्य होईना. त्या आंखूड गादीवर पडल्या असतां पहिल्यानेंच घडलेल्या त्या कारावासांत भूतकाळाबद्दलचे विचार त्यांच्या मनांत येऊं लागले. तें ऐश्वर्य, तो भपका, फारच थोड्या लोकांना मिळेल असा तो ऐषआराम, दूर देशांतले प्रवास, अनेक स्वप्नांची आणि आशांची ती परिपूर्ति–सर्व संवयी व परंपरा सोडाव्या लागतील असें स्थित्यंतर झालें. संपत्ति कमी होऊन त्या मानानें गरिबी आली, ऐषआराम जाऊन हरएक कष्ट पडूं लागले, सुख व सुरक्षितता यांचे दिवस जाऊन चिंता आणि अस्थैर्य यांनीं त्यांची जागा घेतली. लहानसें एकत्र कुटुंब विस्कळित होऊन एक एक माणूस अनिश्चित कालपर्यंत एकमेकापासून दूर जाऊन पडला. हें माताजींचें आजचें जीवन होतें. आणि पूर्वीचे दिवस पुनः येतील ही आशा नव्हती. या सर्व कष्टांत आणि त्यागांत खरोखर कांहीं अर्थ होता का ? का पूर्वीचेंच जीवन बरें होतें ? त्या अंधारांत त्या आपल्याशींच किंचित् हंसल्या. अर्था-तच हे सर्व कष्ट व त्याग मोलाचे होते, इतकेंच नव्हे, तर आपणाला अंतः-

करणपूर्वक प्रिय असलेल्या ध्येयाकरितां याहून देखील अधिक कष्ट सहन करणें मोलाचें ठरलें असतें. साठ वर्षांच्या त्यांच्या आयुष्यांत आज अत्यंत अभिमानाचा परम उज्ज्वल दिवस उगवला होता. कारण आपल्या कुटुंबीयांबरोबरच केवळ नव्हे, तर हजारों देशबांधवांबरोबर तुरुंगांत जाण्याचा मान त्यांनीं मिळविला होता. हळूंहळूं, खूप थकवा आल्यामुळेंच त्यांचे डोळे मिटले आणि त्या तशा थंडींत त्या झोपीं गेल्या. त्यांच्या ओंठावर स्मित होतें आणि हृदयांत शांति होती.

रेखाच्या खोलींत खूप अंधार होता. थंडी मी म्हणत होती. आणि एका कोंपऱ्यांत ती गोंधळलेल्या मनःस्थितींत पडली होती. गेल्या कांहीं आठवड्यांतील घटना तिला दुःस्वप्नासारख्या वाटत होत्या. तें सहज विसरतां येण्यासारखें स्वप्न नव्हतें. अजूनही तिला भोंवतीं क्रुद्ध आवाज ऐकूं येत. माणसें तिला ढकलीत आहेत, तिच्याकडे बोटें दाखवीत आहेत, ती जणूं प्राणिसंग्रहांतील एखादें विचित्र जनावर आहे असें तिला वागवीत आहेत, असा भास होई. एखाद्या भयंकर स्वप्नाप्रमाणें तिला तें आठवे आणि सारा वेळ तिचें डोकें दुखून जाई. तिनें डोळे मिटले तरी विचित्र असे क्रूर चेहरे तिला समोर दिसत आणि ते सर्व तिला धिक्कारीत आहेत, असें वाटे. तिला तें न्यायगृह आठवे. माणसांची 'ही' गर्दी; परंतु मायेचें मात्र एकही नाहीं! काळा झगा घातलेल्या एका माणसानें तिला मूर्खपणाचे अगणित प्रश्न विचारावेत; केव्हां तो चुकीचें हिंदुस्थानी बोलूं लागला म्हणजे तिला हंसूं येई. आपल्या मातृभाषेंत त्याला नीट कां बोलतां येऊं नये, याचें तिला नवल वाटे. पण मग तिला कुणी सांगितल्याचें आठवे कीं जीं माणसें विलायतेस जाऊन येतात तीं आपले शिष्टाचार, पद्धति, भाषा, सर्व कांहीं विसरून परकीयांची नक्कल करतात!

हा अगदीं मूर्खपणा वाटला तिला. न्यायगृहांत एकच दयाशील गृहस्थ होता; आणि तो म्हणजे न्यायाधीश. रेखाला तो समजूतदार आणि मायाळू दिसला आणि त्याची तिला पुढें भीति वाटली नाहीं. एकदां एक पोलिस अधिकारी तिला पुढें खेंचूं लागला, तेव्हां त्या न्यायाधीशानें त्याला तसें करण्याची मनाई केली.

मूर्खासारखे तिला विचारण्यांत आलेले ते प्रश्न आठवले म्हणजे अजूनही तिच्या डोक्यांत तिडीक उठते. "तूं आपल्या मुलाचा खून केलास कीं

नाहीं ?...आपलें मूल मारायची इच्छा तुला कां झाली ? आपण किती भयंकर गुन्हा करतों आहोंत हें तुला कळलं नाहीं काय ? हे अमानुष स्त्रिये ! याबद्दल आपण फांशीं जाऊं हें तुला कसें कळलें नाहीं ?" हे आणि असेच दुसरे अनेक प्रश्न विचारण्यांत येत. रेखा इतकी गोंधळलेली होती कीं तिला कांहींच उत्तर देतां येईना. प्रश्न जेव्हां पुनः पुन्हा विचारण्यांत येत, तेव्हां ती आपल्याशीं पुटपुटे, " माझं बाळ, माझा लहान मुलगा, मीं त्याला मारला नाहीं. माझ्या प्राणापेक्षांही माझं त्याच्यावर प्रेम होतं; पण त्याची उपासमार होत होती म्हणून माझ्या लहानग्या बाबूला घेऊन जा आणि मी येईपर्यंत सांभाळ कर असं मी देवाला म्हटलं. देवानं त्याला नेलं." परंतु रेखावर मुद्दाम खून केल्याचा आरोप ठेवण्यांत आला.

कष्ट आणि दुःख यांनीं थकलेलें रेखाचें मन भोंवतालच्या परिस्थितीचा विसर पडून तिच्या यौवनाच्या काळापर्यंत गेलें—ती गांवांतील हजारांत देखणी मुलगी समजली जाई. गांवांतील प्रत्येक मुलास ती आपली सह-चारिणी व्हावी असें वाटे. तिच्या वडिलांनीं पाटलाचा सुंदर मुलगा साधु हा जांवई म्हणून पसंत केला आणि या निवडीनें रेखा खूष होऊन गेली. साधु उंच व सडपातळ होता. बैलासारखें बळ त्याच्या अंगीं होतें. त्याच्या वडिलांजवळ शेतें, गाई, म्हशी, बैल, अशी खूप जिंदगी होती. तो शिक-लेलाही होता. रेखालाही शिक्षण मिळालें होतें; कारण तिचा बाप साक्षरता-प्रसाराच्या कामीं झटणारा एक निरलस कार्यकर्ता होता. पतीची निवड पाहून रेखाला खरोखरच आनंद झाला होता.

त्यांचें लग्न वसंत ऋतूंत झालें. त्या गांवांत असा टोलेजंग लग्नसमारंभ कधीं झाला नव्हता असें जो तो म्हणूं लागला. साधूचे आई-बाप रेखावर खूष होते. आणि लवकरच तिच्यावर जीव लावूं लागले. रेखा खरोखर आदर्श सून होती. खेड्यांतील इतर मुलांप्रमाणें साधु सायंकाळीं पत्ते कुटीत किंवा चकाट्या पिटीत हिंडत नसे. आपल्या घरीं पत्नीशीं बोलत बसे. मधून मधून धान्य विकण्याकरितां त्याला शेजारच्या गांवीं जावें लागे. परत येतांना तो रेखाकरतां कांहीं तरी वस्तू भेट म्हणून घेऊन येई. असा त्यांचा आदर्श सुखी संसार चालला होता. दररोज रेखा देवळांत गेली म्हणजे परमेश्वराचे अनन्यभावें आभार मानी.

दिवस भराभर गेले आणि एके दिवशीं रेखाला मुलगी झाली. ही बाळसेदार व निकोप छोकरी आपल्या देखण्या आईचें जणूं प्रतिबिम्ब होती. आतां जीवनाला अगदीं पूर्णता आली. एका वर्षानें आणखी एक मुलगी झाली. रेखाला मुलगा व्हावा अशी इच्छा होती; पण लवकरच ती ह्या निराशेंतून वर आली आणि ती ह्या नव्या छोकरीवर प्रेम करूं लागली. कांहीं महिन्यांनीं साधूचा बाप थोड्याशा आजारानंतर कालवश झाला. या दुःखांतून ते वर येतात तोंच वृद्ध माताही निवर्तली, आणि आतां साधु आणि रेखा व त्यांचीं मुलें एवढाच काय तो परिवार राहिला.

अशीं सुखाचीं किती तरी वर्षें गेलीं. साधूचें फार चांगलें चाललें होतें. पुन्हां रेखाला दिवस गेले. आणि या वेळीं तरी मुलगा व्हावा अशी तिनें देवाची मनोभावें प्रार्थना केली. तिची प्रार्थना सफल होऊन योग्य वेळीं तिला मुलगा झाला. त्याच्या आईबापांनाच नव्हे, तर जे कोणी त्याला पाहत त्यांना या मुलाच्या दर्शनानें आनंद होई. दररोज तो मोठा आणि बाळसेदार होत गेला. तो नेहमीं हंसे, आणि कांहीं तरी गमतीदार शब्द करी; जणूं काय आपल्या जीवनावर पूर्ण संतुष्ट असल्याचें दाखवी.

एके दिवशीं गांवांत कांहीं विचित्र लोक शिरले. ते भयंकर कृश व भेसुर दिसत. ते कसे तरी रखडत चालत होते. त्यांना चालतांही येत नव्हतें. गांवकरी त्यांच्याभोंवतीं जमले आणि त्यांना निरनिराळे प्रश्न विचारूं लागले. भुकेनें खोल गेलेल्या आवाजांत त्यांनीं आपली सर्व कहाणी सांगितली. ते दुष्काळांत सांपडले होते. उपासमार व रोगराई यांनीं त्यांना गांठलें आणि त्यांच्यातले शेकडों लोक मेले, अजूनही मरत होते. हा गांव संपन्न आहे अशी कीर्ति त्यांच्या कानावर गेल्यानें अन्न व निवारा मागण्याकरितां त्या गांवांत ते आले होते. गांवकऱ्यांनीं आनंदानें त्यांची मागणी पुरविली. कांहीं काळ विशेष कांहीं घडलें नाहीं; पण लौकरच त्या नव्या बुभुक्षितांचा वाईट पायगुण म्हणून म्हणा, रेखाच्या त्या खेड्यांत दुष्काळ पडला. पाऊस उशीरां आला आणि तोहि अपुरा पडला. ऊन म्हणजे इतकें कडक कीं त्यामुळें तांदळाचीं व इतर धान्याचीं बीजें कोळपूनच जावींत. दिवसेंदिवस अन्नाची टंचाई पडली आणि त्या खेडेगांवांतले लोक वाळके व सुकलेले दिसूं लागले. मिळेल तें

मुलांकरितां जपून ठेवीत, पण तरीही मुलें अधिकाधिक बारीक होऊं लागलीं. कांहीं दिवसांनीं बरेच लोक अकल्पितपणें आजारी पडले आणि मेले. त्यांना या एकाएकीं आलेल्या मरणाचें कारण कुणाला कळलें नाहीं. पूर्वीं कधींही असे व इतके अचानक मृत्यु त्या गांवांत झाल्याचें कुणाला माहित नव्हतें.

रेखानें शक्य तितकी सावधगिरी घेऊन आपलीं मुलें खेडेगांवच्या इतर मुलांपासून दूर ठेवलीं. हेतु हा कीं आपल्या मुलांना अचानक मृत्यूचे पाश टाकणारा तो रोग होऊं नये. त्यांना ती अन्नाला कमी करीत नसे. मुलांसाठीं ती आणि तिचा नवरा कित्येक दिवस उपास काढीत आणि त्यामुळें तीं अगदीं खंगून गेलीं होतीं. परंतु त्यांचा लहानसा सांठा पुरणार तरी किती दिवस ? एके काळचीं तीं सुपीक शेतें आतां अगदीं सुकून आणि कोळपून गेलीं. त्यांतून धान्य कांहींच निघेना !

अखेर तो भयानक दिवस उजाडला ! सर्वांत मोठें मूल एक दिवस अचानक मृत्युमुखीं पडलें. या रोगाचें निदान खेडेगांवांतल्या वैद्याला करतां आलें नव्हतें, असा रोग त्याला झाला. दहा दिवसांनंतर दुसऱ्या मुलालाही तोच रोग जडला, आणि पोर आजारी आहे हें आईबापांना कळायच्या आंतच तें दगावलें ! या दुःखानें होरपळून रेखा धाकट्या मुलाला ( बाबूला ) धरून बसली. क्षणभरही त्याला दृष्टीआड होऊं देईना. अहोरात्र ती त्यावर देखरेख ठेवी, आणि देवाची प्रार्थना करी कीं, "कांहीं करून एवढें पोर राहूं दे. मला न्यायचें असलें तरी न्या, पण हें पोर वांचवा !" पण देव फार लांब होता, आणि रेखाची प्रार्थना ऐकण्यास त्याला वेळ नव्हता. दररोज बाबू अधिकाधिक कृश होत चालला. त्याचे गुबगुबीत गुलाबी गाल कमी होऊन ओढल्यासारखे दिसूं लागले. नेहमीं मोठ्या संतोषानें हंसत खिदळत राहणारा बाबू आतां सारखा आक्रोश करी. भूक आणि अशक्तता यांमुळें तो अस्वस्थ असे. कांहीं तरी खाण्याकरितां होणारी त्याच्या ओठांची हालचाल पाहिली कीं रेखाला हृदयांत सुरी गेल्यासारखें वाटे. घरांत अन्न मुळींच शिल्लक नव्हतें. असलेंच तर एकदोन दिवसांचें असेल. आणि खेड्यांतून तर कांहीं मिळायची सोय नव्हती. गोंधळलेल्या मनःस्थितींत रेखानें कुठून अन्न मिळतें का, हें पाहण्याला प्रयत्न केला. पण कांहीं आशा

दिसेना. आतां हें मूल उपासमारीनें कणकण झिजत जाऊन यातनांत मृत्यु पावणार हें तिला कळून चुकलें. या मुलाला वांचविण्याचा कांहीं मार्ग आहे का ? याच्या चिंतनांत तिनें कित्येक रात्री अलोचन जाग्रणें केलीं, पण कांहीं मार्ग दिसेना !

तिचें डोकें दुःखूं लागलें. आणि तें फुटणार असें तिला वाटूं लागलें. नंतर एक कल्पना अचानक तिच्या डोक्यांतून चमकून गेली. त्या कल्पनेची तिला भीति वाटली. पण बाबूच्या यातना वांचविण्याचा तो एकच मार्ग होता. तिच्या मनांत आतां गोंधळ राहिला नाहीं. सर्व कांहीं स्पष्ट दिसूं लागलें ! पण छे! तिच्याच्यानें ही गोष्ट होणें शक्य नव्हतें. तिच्यासमोर अत्यंत कृश आणि मरणोन्मुख होऊन पडलेल्या बाबूकडे तिनें पाहिलें. भुकेच्या वेदनांनीं मधून मधून तो किंचाळत होता. मांस झडून गेलेलें आणि बरगड्या एकूण एक मोजून घ्याव्यात इतक्या स्पष्ट ! रेखाच्या डोळ्यांतून अश्रु ओघळले. तिनें बाबूला झटकन् उचलून घेतलें, आणि आपण काय करीत आहोंत हें पुरेसें न कळतां हृदयाशीं घट्ट घट्ट आंवळलें. त्यानें क्षीण प्रतिकार केला. तो गुदमरून गेला; पण त्याच्या अंगीं कांहींच बळ उरलें नव्हतें. एक किंचाळी फोडून तो गप्प झाला. परंतु रेखा मात्र त्याला सोडीना. तें निर्जीव शरीर तिनें मगरमिठींत धरलें होतें. नंतर तिलाही बधिरपणा वाटूं लागला. तिनें हात सोडण्याचा प्रयत्न केला; पण ते सुटेनात. मग आपोआप ते सुटे झाले. तेव्हां रेखानें बाबूला चटईवर ठेवलें. एवढा वेळ असह्य ताण पडल्यामुळें ती त्याच्याजवळ पडली आणि त्याच्या गळ्याभोंवतीं एक हात टाकून झोपीं गेली.

रेखा किती वेळ झोंपली कुणाला ठाऊक ! पण साधूनें तिला उठविलें त्या वेळीं तिला नीटशी शुद्धि नव्हती. तिनें भोंवतालीं पाहिलें तों पुष्कळशीं माणसें तिच्या झोंपडींत जमलेलीं होतीं. साधु रडत होता. आणि इतर जण कांहीं तरी बोलत होते. कुणी तिच्याकडे, तर कुणी तिच्या बाळाकडे बोट दाखवीत. कां तें तिला कळेना ! गोंधळलेल्या मनःस्थितींत काय झालें तें आठविण्याचा ती प्रयत्न करूं लागली. आपल्याकडे बोटें दाखवून लोक काय कुजबुजत आहेत ? इथें इतकीं माणसें कां जमलीं ? साधु न बोलतां

डोळयांतून पाणी कां काढीत आहे ? एकदम तिनें भीतीनें बाबूकडे पाहिलें आणि तिला सर्व आठवण आली. तें एक भेसूर स्वप्न होतें. त्याला उपासमारीच्या यातनांतून सोडविण्याकरितां मारावें असें तिला वाटत होतें. पण तें ती करूं शकली नव्हती. तिनें फक्त त्याला मिठी मारली होती, आणि कांहीं तरी अनुचित प्रकार घडला होता. त्या थंड देहाकडे तिनें पाहिलें आणि त्याच्या चिमकुल्या तोंडाला स्पर्श केला. तें बर्फासारखें गार लागलें. आणि रेखाच्या हृदयांत धडकी भरली. बेसावधपणें तिनें चहूंकडे पाहिलें आणि आपल्या मनांत वाटणारी भीति कुणी तरी खोटी आहे म्हणून सांगावी या आशेनें ती पाहूं लागली. पण तसें कुणी केलें नाहीं. तिनें बाबूला हृदयाशीं घेतलें. इतक्यांत 'पोलिस' अशी कुजबुज सुरू झाली. आणि लोकांनीं पोलिसांना वाट करून दिली. पोलिस रेखाजवळ आले आणि खसकन् तें मूल तिच्याकडून ओढून त्यांनीं तिला उभें राहण्याविषयीं फर्मा-वलें. ते काय म्हणत आहेत हें तिला कळेना. ' मारेकरणी, ऊठ ! ' असें एक पोलिस म्हणाला. आणि त्यानें निष्ठुरपणें तिच्यावर प्रहार केला. पण रेखाला कांहीं लागत नव्हतें, समजत नव्हतें. मग साधूनें येऊन हळूच तिला उभें केलें. साधूनें तिला पोलिसांच्या गाडींत बसविलें आणि तुरुंगापर्यंत तो तिच्याबरोबर होता. त्याचे खांदे मूक स्फुंदनानें हलतांना दिसत होते. त्यानें मस्तक नम्र करून तिचा निरोप घेतला आणि मागें वळून तो दिसेनासा झाला.

कोठडींत अंधार होता. गारठा मी म्हणत होता. रेखा एकदम घाबरली. तिचा प्रिय सौजन्यशील पति, प्रियकर व सहचर साधु तिला निकट यावा असें वाटत होतें. " साधु ! " ती मोठ्यानें किंचाळली, " साधु ! मला घरीं घेऊन जा ! "

" गप्प बस ! " रेखाची पहारेकरीण म्हणाली, " नाहीं तर मी बळ-जबरीनें तुला गप्प बसायला लावीन. " पण रेखाला तेंही ऐकूं आलें नाहीं. ती किती तरी महिने तुरुंगांत होती. अनेक ठिकाणीं तिला हिंडविण्यांत आलें होतें. पहारेकरणीनें तिला मारलें होतें. आणि बरोबरीच्या कैदी स्त्रियांनीं तिची कुचेष्टा केली होती. पण तिनें कशाचीच फिकीर केली नाहीं. तिला

तिचा साधु पाहिजे होता, आणि त्याला ती सारखी हांका मारीत होती. पहारेकरणीची काठी तिच्या डोक्यावर बसली. एक, दोन, तीन-पहिल्यानें तिला मार लागला. पण नंतर तिची शुद्ध गेली, आणि तिला यातना होईनात. पुन्हां एकदां ती आपल्या घरीं साधु आणि आपलीं मुलें यांसह आली होती. ती तुरुंगाबाहेर कशी पडली? मध्यें घडलें तें स्वप्न तर नसेल एखादें! पण आतां ती सुखांत होती. आणि आतां सर्व ठीक झालें होतें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं रेखा आपल्या खोलींत मरून पडलेली आढळली!!

दुर्गी उंच, सडपातळ अशी एकोणीस वर्षांची मुलगी होती. तिचे अवयव नितळ आणि सशक्त असे दिसत. तिच्या चालण्यांत एक प्रकारचा विलक्षण डौल व ऐट होती. तिला सुंदर म्हणतां आलें नसतें; पण तिच्यांत असें कांहीं आकर्षण होतें कीं तिला पाहतां क्षणींच कोणाचेंही चित्त ती वेधून घेई. तिचे डोळे पाणीदार होते; आणि त्यांत नेहमीं आनंदाची छटा दिसे. असा भास होई कीं सर्व जगाला तुच्छ लेखून ती हंसतच आहे.

त्या बालगुन्हेगारांच्या तुरुंगांत दुर्गी फार लोकप्रिय होती. ती कधीं खिन्न किंवा रागावलेली नसे. ती नेहमीं हंसे, विनोद करी. आणि कुठें कुठें जमविलेलीं गाणीं गुणगुणत हिंडे. कडक उन्हाळ्याच्या दिवशीं कितीही कष्टाचें काम पडलें तरी तिची आनंदी वृत्ति मावळत नसे. अगदीं कजाग अशा पहारे-करणीसुद्धां दुर्गीला कधीं शिव्या देत नसत. कारण दुर्गी त्यांच्या शिव्याकडे आणि त्यांनीं केलेल्या अपमानाकडे लक्ष देत नसे. फक्त तुरुंगावरील मुख्य अधिकारी मात्र दुर्गीवर नाराज असे. जेलच्या कष्टमय जीवनांत दुर्गी आपला आनंद टिकवूं शकते आणि हंसतमुख राहते याचाच तिला राग येई. दुर्गीत कांहीं दोष काढतां येत नसे, यामुळेंही ती नाराज होती. पण तिला सर्वांत लागणारी गोष्ट वेगळीच होती. दुर्गी कधीं जाडेभरडेच कपडे अंगाभोंवतीं गुंडाळून घेई, एखादें वाळकें पान नाहींतर फूल आपल्या केसांमध्यें अडकवून देई, आणि मोठी सुंदर दिसूं लागे. त्या अधिकारी स्त्रीला याचाच राग होता.

दुर्गी वरून जेवढी भाबडी दिसे, तेवढी ती खरोखरच नव्हती. तिचें चालू वय एकोणीस होतें, आणि तीन वर्षांपूर्वी नवऱ्यावर विषप्रयोग केल्याबद्दल तिला तुरुंगांत टाकण्यांत आलें होतें. दुर्गीनें हा विषप्रयोग जाणूनबुजून केला होता आणि त्याबद्दल तिला वाईट वाटत नव्हतें. तिला

एका गोष्टीचें मात्र वाईट वाटे ती ही कीं कधीं कधीं एखादी कैदी किंवा पहारेकरीण दुर्गी खुनी नसून विषप्रयोग करणारी आहे असा टोमणा देई! जेलच्या सामाजिक जीवनांत खुनी स्त्रीचा दर्जा पहिला समजला जाई; कारण तिनें तें कृत्य रागाच्या भरांत व क्षणिक संतापानें केलेलें असायचें. इतर तऱ्हेच्या गुन्हेगार स्त्रिया यानंतरच्या क्रमानें येत. पण विषप्रयोग करणारी स्त्री ही मात्र क्षुद्र आणि घातकी समजली जात असे. कारण तिनें केलेलें कृत्य पुष्कळ दिवस विचार करून मुद्दाम केलेलें असणार हें निश्चित असे.

दुर्गी गुन्हेगार होती, यावर कोणाचा विश्वास बसत नसे; कारण ती अतिशय मायाळू, सौजन्यशील, आणि दुसऱ्याला मदत करण्यांत तत्पर असे. कधीं रागावलेली किंवा असंतुष्ट दिसावयाची नाहीं. तुरुंगाचें जीवन तिनें आतां पूर्णपणें पत्करलें होतें. आणि कुठलीही तक्रार करावयाची नाहीं असें तिनें ठरवून टाकलें होतें. मुख्य अधिकारी स्त्री तिच्या गुन्ह्याबद्दल मोठालीं व्याख्यानें झोडी, त्याकडे ती लक्ष देत नसे. यानें चिडून जाऊन ती अधिकारी स्त्री दुर्गीकरतां कष्टाचीं कामें नेमून देई. हेतु हा कीं दुर्गीचा जिवंत झऱ्यांतून खळखळणारा आनंद व उल्हास पार मावळून जावा. परंतु त्याचा उपयोग होत नसे. परेडच्या दिवशीं इतर कैद्यांप्रमाणें जाडाभरडा झगा, ब्लाउज आणि दुपट्टा दुर्गीला घालावा लागे. इतर वेळीं फक्त एक ब्लाउज व एक सलवार घालून ती हिंडे. अनेक वेळां मेट्रननें तिला याबद्दल शिक्षा केली. कारण अतिशय उन्हाळ्यांत असा वेष करण्यास जरी कैद्यांना परवानगी होती, तरी तो वेष करून त्यांना भटकतां येत नसे. कित्येकदां पुरुष कैदी कांहीं दुरुस्तीचीं वगैरे कामें करण्यास तेथें येत, आणि त्या वेळीं सर्व मुलींना कोठड्यांतून कोंडून ठेवण्यांत येई. आणि तरीही त्यांनीं सर्वांग झांकून घ्यावें असा नियम होता. न जाणों एखाद्याचा दृष्टिक्षेप पडायचा! हे नियम मोडून दुर्गी कोठडीच्या गजांजवळ पुरुषांना पाहण्याकरितां दोन वेळां आली! मेट्रननें तिला याकरितां चांगला प्रसाद दिला आणि दुर्गीनें कुरकुर न करतां तो स्वीकारला.

एक दिवस असा हुकूम सुटला कीं सर्व कैद्यांनीं दुपारीं अकराच्या आंत भांडींकुडीं घांसून कोठडींत जाण्यासाठीं तयार व्हावें. आवारामध्यें काम

करण्यासाठीं कांहीं कैदीलोक येणार होते. आणि कुणाही स्त्रीला बाहेर राहण्याची मनाई होती. प्रौढ स्त्रियांना यामुळें थोडें जास्त काम पडलें म्हणून त्या ओरडत होत्या. तरुण मुली मात्र थोड्याशा उल्हसित वृत्तीनें एकमेकींशीं कुजबुजत होत्या. कारण पुरुष आवारांत यायचे असले म्हणजे मुलींना तो दिवस सणासारखा वाटे. मग त्या पुरुषांशीं बोलण्याची मुळींच शक्यता नसेना का !

" दुर्गा, " राधी नांवाची चवदा वर्षांची कैदी म्हणाली, " मी असं ऐकतें कीं या टोळीबरोबर एक नवीन मनुष्य येणार आहे; तो जातीचा शिंपी असून फार सुंदर आहे असं झिनत माई ( पहारेकरीण ) काल सांगत होती. तो खूप उंच आणि जवान आहे. कांहीं दिवसांपूर्वी एका पहारेकऱ्यानं त्याची जरा आगळीक केली, तेव्हां त्यानं त्याला लहान मुलासारखा उचलून फेंकून दिला. त्याला त्याबद्दल अंधारकोठडीची शिक्षा एक आठवडाभर मिळाली. नुकताच तो सुटला आणि आज इथं येणार आहे. त्याला पाहावंसं तुला वाटत नाहीं का दुर्गे ? मला तर फारच वाटतं बाई ! "

" ए, गप्प बस राधे ! " दुर्गी म्हणाली, " मला कुठल्याही पुरुषाविषयीं कांहीं उत्कंठा वाटत नाहीं. आणि तुलाही ती वाटायचं कारण नाहीं. पाहा, हीं जनावरं आपणाला कोणत्या अवस्थेंत नेतात ! द्वेष वाटतो मला त्यांचा. फार वर्षांपूर्वी मला एक मुलगा आवडला होता. तो चवदा वर्षांचा आणि मी बारा वर्षांची होतें. आम्ही एकत्रच वाढलों. आम्हीं लग्न करण्याच्या शपथा घेतल्या; पण त्याचा बाप तें गांव सोडून गेला, आणि त्याबरोबर रामूही गेला. तो फार सुंदर आणि सशक्त होता. आतां तो किती छान दिसत असेल ! माझी खात्री आहे, रामूसारखा जगांत कोणी पुरुष असणंच शक्य नाहीं. माझ्या रामूशिवाय मला कुणी नको. " दुर्गीचे डोळे स्वप्नाळू दिसत होते. ती भूतकाळांत दूर कोठें तरी पाहत आहे असें दिसलें. पण तिच्या त्या छोट्या मैत्रिणीला अधिक जाणून घेण्याची उत्सुकता होती.

" दुर्गी, " इतरांनीं ऐकूं नये म्हणून हलकेच ती म्हणाली, " याबद्दल तूं मला पूर्वी कां नाहीं बोललीस कांहीं ? रामूकरितां कां तूं आपल्या नवऱ्याला विष घातलंस ? "

" छे ग! बावळट पोरी, " दुर्गी म्हणाली, " मी रामूसाठीं थांबलें होतें. तो परत येईल अशी मला नक्की खात्री होती. म्हणून मीं लग्न करण्याचं नाकारलं; पण आईबाप तें ऐकेनात. लग्नाच्या दिवशीं दोन वेळीं मी पळून गेलें आणि लपून बसलें. माझ्या वडिलांचं माझ्यावर फार प्रेम होतं. तरीही त्यांनीं मला चोप दिला. तिसऱ्या वेळीं मला कोंडून ठेवण्यांत आलं आणि माझं लग्न लावण्यांत आलं. माझा नवरा वाळका, दिसायला दरिद्री, आजारी आणि रासवट असा होता. मला त्याची फार भीति वाटे आणि अत्यंत क्रूरपणं तो मला वागवी. त्यानं माझ्या शरीराचं खेळणं केलं होतं. आणि मी जेव्हां थोडी मोकळीक मागें व आईकडे जाऊं देण्याविषयीं त्याची प्रार्थना करीं, तेव्हां खदखदां हंसून तो अधिकच क्रूर होई. मी दोन वर्षं हा ताण सहन केला. दररोज तो अधिकाधिक वाईट वागूं लागला. आणि मला अपत्यहीनतेबद्दल दोष देऊं लागला. एक दिवस त्यानं अगदीं कहरच केला. तेव्हां मी त्याला ठार करण्याची प्रतिज्ञा केली. मीं कांहीं प्राणघातक रसायनं हळू हळू जमविलीं. पुढें दररोज मी त्याच्या जेवणांत तीं थोडीं थोडीं मिसळीत असें. परंतु त्याचा जेव्हां परिणाम होईना, तेव्हां एक दिवस मोठ्या प्रमाणांत मीं तीं मिसळलीं. एक तासानंतर परिणाम दिसूं लागला आणि वैद्य यायच्या आंतच तो मेला! त्याच्या आईला संशय येऊन तिनं मला पोलिसच्या ताब्यांत दिलं. त्याच्या शरीराची तपासणी करण्यांत आली. त्यांत विष सांपडलं. आणि अशा रीतीनें मी इथं येऊन पडलं! "

त्या दोन मुली बोलण्याच्या नादांत इतक्या गुंगल्या कीं इतरांबरोबर, कोठड्यांतून जायचें त्यांचें राहूनच गेलें. "ए, काफराच्या कारट्यांनो, तुमच्या राजवाड्यांत शिरण्याचा तुमचा विचार ठरेपर्यंत मी किती वेळ तिष्ठत उभं राहायचं? व्हा भिकारड्यांनों, आंत व्हा! नाहीं तर हा चाबूक उगारलाच म्हणून समजा!" पहारेकरीण खेंकसली.

परंतु तिच्या शब्दांकडे आणि धमक्यांकडे लक्ष न देतां दुर्गी हळू हळू बराकीकडे चालली होती. आणि राधी मात्र पहारेकरणीचा चाबूक बसेल अशा अर्धवट भीतीनें रेंगाळत होती. कड्या, कुलुपें वाजलीं आणि सुमारें पांच-सहा कोठड्या व अनेक बराकी लावल्या गेल्या. चोहींकडे

स्मशानशांतता पसरली. आवारांत आलेल्या पुरुषांशीं बोलण्याची कुणालाही परवानगी नव्हती.

लोखंडाचें मोठें दार उघडलें, आणि सुमारें बारा पंधरा माणसें एका रांगेनें आंत आली. त्यांच्या हातांत हत्यारें होतीं. आणि हातांपायांत बेड्या होत्या. अगोदर बोलण्याची गडबड आणि नंतर एकदम शांतता झाल्यानें त्या बेड्यांचे आवाज विशेष स्पष्ट आणि क्रूर वाटत. पुरुष कैद्यांना स्त्रियांचें यत्किंचितूही दर्शन होऊं नये म्हणून आपापल्या कोठडींत त्यांनीं दाराकडे पाठ करून बसावयाचें होतें. परंतु पहारेकरणीचा डोळा चुकवून आणि तिच्या दमदाटीची पर्वा न करतां लहान मुली मधूनमधून चोरून पाहतच ! पहारेकरीण समजुतदार असली तर याकडे कानाडोळा करी. आणि कित्येकदां लांच म्हणून त्या मुलींकडून जास्त काम करून घेई. मुलीही तें आनंदानें करीत. बरेचसे प्रसिद्ध चोर, दरोडेखोर, खुनी वगैरे कैदी स्त्रियांना नांवानें माहित असत आणि त्यांच्याबद्दल अद्भुत कथा रचल्या जात.

राधी आणि दुर्गी एकत्र बसल्या होत्या. राधी बाहेर डोकावून पाहण्याचा प्रयत्न करीत होती. आणि दुर्गी थंडपणें मेट्रननें दिलेला स्कार्फ विणीत बसली होती. " दुर्गी, " राधी म्हणाली, " अहमद आलाय् बघ ! त्यानें आपल्या पांच बायकांना ठार केलें, आणि मग तो सांपडला. काय माणूस आहे ! शुक्रू शिंपीही आलाय, आणि गणेश सुतार, तोही आहे. त्याला बिचाऱ्याला अन्यायानं शिक्षा झाली होती. आणि हा महादेव; त्यानं आपल्या बायकोच्या जाराचा खून केला. अगोदर त्याचं नाक कापलं, आणि मग पोलीसांच्या स्वाधीन झाला...काय मूर्ख आहे ! तो सहज पळून जाऊं शकला असता......आणि दुर्गी, तो नवीन मनुष्य ! आपण ऐकत होतों त्यापेक्षां-सुद्धां विलक्षण दिसतो. "

दुर्गीची उत्सुकता जागृत झाली आणि तिनें मागें वळून पाहिलें. कांहीं माणसें सामान टाकण्याकरितां बराकीजवळ आलीं. आणि दुर्गीची नजर एका सुंदर तरुण माणसावर खिळली. कांहीं गूढ अशी ओळख तिला पटत होती. त्यानेंही आपली दृष्टि तिच्यावर रोखली आणि ते कांहीं क्षण त्याला अनंत काळाच्या मोलाचे वाटले. दुर्गीला त्याच्या कटाक्षाची जबर-

दस्त मोहिनी वाटली. तिची नाडी जलद वाहूं लागली. आणि हृदयाचें स्पंदन जोरांत होऊं लागलें. "काय ?" एकदम ती आपल्या मनाशीं म्हणाली, "काय, मला काय होत आहे ?" इतक्यांत तो परका मनुष्य पुढें आला आणि म्हणाला, "दुर्गी, माझ्या प्रियतमे, मी तुला अखेर शोधून काढलं कीं नाहीं ? तूं इथं कशी ? मी तुरुंगांत आलों हें ठीकच झालं; नाहीं तर तुझी माझी गांठच पडली नसती. दुर्गी, बोल, मी तुझा रामू आहें. ओळखलंस मला ?"

"ए, परत जा रे." पहारेकरीण म्हणाली, आणि दुर्गी आणि रामू यांच्यामध्यें ती आली. "मागं वळ, नाहीं तर मी मेट्रनला सांगेन आणि मग तुला चांगली शिक्षा होईल. ए पहारेकरी, या कैद्यांना तूं आमच्या मुलींशीं बोलूं कसा देतोस ? भल्या माणसा, मी तुझा रिपोर्ट करीन. या माणसाला लवकर परत ने !" पहारेकरी पुढें झाला, आणि त्यानें रामूच्या तोंडावर एक चाबूक लगावला. पण रामूला त्या प्रहाराचें किंवा त्यामुळें ठिबकणाऱ्या रक्ताचें भान नव्हतें !

या प्रकारानें स्तिमित होऊन दुर्गी स्तब्ध उभी राहिली. पहारेकरणीनें तिला ओढण्याचा प्रयत्न केला; पण ती हलेना. हें कसें होणार ? ती स्वप्नांत होती का जागी होती ? तो रामूच होता. पण त्याला नेण्यापूर्वी त्याच्याशीं बोलणें जरूर होतें. "रामू," ती ओरडली, "मी तुझी दुर्गी आहें. मी तुझी भेट होण्यासाठीं उत्सुक होऊन राहिलें आहें." पण वाक्य पुरें झालेंच नाहीं. दुर्गीच्या डोक्यावर प्रहार करून पहारेकरणीनें तिला आंत खेंचलें. शिव्याशाप देत तिला तिनें आंत कोपऱ्यांत कोंबलें. ती एकसारखी रडत होती. तिला कल्पना नव्हती कीं दुर्गीचे अश्रू हे दुःखाचे नसून आनंदाचे आहेत. ती आनंदाश्रु ढाळत होती. कारण तिचा रामू तिला अखेर भेटला होता. आणि आज कसल्याही प्रहारांनीं तिला दुःखीकष्टी केलें नसतें.

नंतर जेलच्या अधिकाऱ्यानें पुरुष कैदी आणि स्त्री बंदी एकमेकांच्या नजरेस पडणार नाहींत असा कडक बंदोबस्त केला. दुर्गीला एक आठवडा अंधारकोठडीची शिक्षा मिळाली. आणि तरीही लवकरच रामूकडून तिला

वार्ता आलीच. कारण दुर्गी सर्वांची आवडती होती. ती दुसऱ्याला मदत करी. त्यामुळें तिला मदत करायला सर्वजणी उत्सुक असत. एके दिवशीं पहारेकरणीनें रामूची चिठ्ठी दुर्गीला दिली. पहारेकरणीच्या एका मित्रानें ती तिला दिली होती. त्या चिठ्ठींत रामूनें लिहिलें होतें कीं "मला फक्त एक वर्षाची शिक्षा झाली आहे. आणि तुझ्या आधीं मी बाहेर पडेन. मी तुझी बाहेर वाट पाहीन आणि तूं तुरुंगांत असेपर्यंत मी तुला भेटायला येत जाईन." या चिठ्ठीनें दुर्गीला नवी आशा आणि नवें धैर्य आलें. पूर्वी जी दुर्गी आंधळेपणानें यंत्रासारखें काम करायची, ती आतां चैतन्य पूर्वक कामांत लक्ष घालूं लागली. तिच्या मुद्रेवर पुन्हां हास्य झळकूं लागलें. आणि हळू हळू ती गाऊंही लागली. तुरुंगांतील सर्व स्त्रियांनीं समाधानाचा सुस्कारा सोडला. कारण दुर्गीच्या दुःखांत त्या सर्व सहभागी होत्या. आणि आतां ती आनंदी आणि प्रफुल्ल झाल्यामुळें सर्वांनाच तुरुंगाचें जीवन सुसह्य वाटूं लागलें.

एक वर्ष झपाट्यानें गेलें. रामू आणि आपण एकत्र राहणार आहोंत, या कल्पनेनेंच तिला खूप हुरूप येई. या वर्षाच्या काळांत एका पहारेकरणीच्या मदतीनें ती रामूशीं दोनदां बोलली होती. आणि तिनें सहा–सात चिठ्ठया पाठविल्या होत्या. रामूची सुटण्याची वेळ झाली, तरी दुर्गीला फारसें वाईट वाटलें नाहीं. कारण बाहेर गेल्यावरही रामू आपल्या वाटेकडे डोळे लावून बसेल ही तिची श्रद्धा होती. रामूनें तुरुंग सोडल्यानंतर कांहीं दिवस दुर्गीचा उत्साह जरा मावळला; पण नंतर तिनें तुरुंगजीवनाशीं जमवून घेतलें आणि ती पूर्ववत् उल्हसित झाली.

हळू हळू वर्षें संपलीं आणि आपल्या मुक्ततेच्या दिवसाची वाट पाहत दुर्गी राहिली. अखेर तो दिवस उजाडला. इतके दिवस ज्या तुरुंगाला तिनें आपलें घर मानलें होतें, तो तुरुंग सोडतांना तिला किंचित् भयच वाटत होतें. या लहानशा जगांत सर्व तिला ओळखत होते, त्यांच्या आपल्याविषयींच्या भावनांची आणि एकंदर जगाची तिला कल्पना होती. त्यांच्याशीं ती कांहीं ऋणानुबंधानें बांधली गेली होती. पण आतां बाहेरच्या अफाट दुनियेंत लोक आपणांस कसे वागवतील? आपला पूर्वेतिहास विसरून ते आपणांस पत्करतील काय? का पूर्वींचीं पापें आपल्या पाठीमागें हात धुवून

लागतील ? आपल्या नवऱ्याला ठार केल्याबद्दल तिला मुळींच वाईट वाटत नव्हतें. आणि तें पाप मानायला तर तिचें मन तयार नव्हतें. पण लोकांनीं मानलें असतें; त्याचें काय ? आणि रामू ? तो जेलच्या फाटकाबाहेर आपणांला भेटायला येईल काय ? कीं स्नेहशून्य जगांत तो आपणाला एकटें सोडून देईल ?

हे विचार तिच्या मनांत येत आणि तिची चिंता आणि भय वाटे. मेट्रन आली आणि तिनें दुर्गीला आपल्या नेहमींच्या करड्या आवाजांत आपले फाटके तुटके कपडे गोळा करून कचेरीपर्यंत चलण्याविषयीं फर्माविलें. तेथें तिच्या सुटकेचा हुकूम तिच्या हातीं पडणार होता. अश्रुपूर्ण नेत्रांनीं सर्व मैत्रिणींचा दुर्गीनें निरोप घेतला आणि कित्येक कैदी स्त्रिया दुर्गी जाणार म्हणून ढसढसा रडल्या.

शेवटीं त्या स्त्रियांच्या तुरुंगाचें फाटक उघडलें जाऊन दुर्गी बाहेर पडली. मेट्रनच्या मागोमाग जातांना दुर्गीच्या अंतःकरणांत भय वाटत होतें आणि तिची मान खालीं होती. ज्या भिंतींनीं तिचें इतके दिवस संरक्षण केलें होतें त्यांचा पुनः मोह पडेल या भीतीनें तिनें त्यांकडे दृष्टिक्षेपहि केला नाहीं. ती मनांत देवाची प्रार्थना करीत होती, " हे रामा ! लोक म्हणतात तितकं जग निष्ठुर नाहीं याचा मला अनुभव येऊं दे. लोकांनीं माझा द्वेष करूं नये अन माझ्या रामूनं मला सोडूं नये, एवढंच माझं मागणं. "

जेलच्या मुख्य दरवाजाशीं आल्यावर दुर्गी इतकी घाबरली होती कीं तिला सभोंवार पाहण्याचा धीर होईना. तिला एकलेपणा वाटूं लागला आणि रामू येणार नाहीं याची खात्रीच वाटली तिला. वाटेंत पडलेल्या एका बादलीवर ती धडपडणार तों एक पहारेकरी तिला म्हणाला, "ए पोरी, कुठं पाहून चालतेस ?" यावर दुर्गी नेहमींच्या उद्धट स्वभावाप्रमाणें कांहीं उत्तर देणार तों लांब एका झाडाखालीं रामू एक्का घेऊन तिला नेण्यासाठीं उभा असलेला तिला दिसला. दुर्गी मेट्रनच्या मागून जात होती. रामूला पाहून तिच्या चेहऱ्यावर हास्याची प्रभा पसरली. आतां सर्व ठीक झालें. इतकीं वर्षें जें योजलें होतें तें जीवन तिला आतां जगायला मिळणार होतें. कांहीं मिनिटांनीं पूर्वीप्रमाणें हास्यमुद्रेनेंच पण आतां ताठ मान करून जेलच्या बाहेर ती रामूकडे चालूं लागली, रामूही तिला सामोरा येत होता.

## शरबती



अमृतसरजवळ एक लहान खेडेगांव होतें. तेथें अब्दूल म्हणून शेतकरी राहत असे. तो चांगला संपन्न होता आणि आहे त्या स्थितींत सुख मानून राही. त्याची बायको चांगली कष्टाळु असून त्याला चार मुलगे होते. या मुलांसारखे कष्टाळु, दणकट आणि देखणे गांवांत कोणी नाहींत याचा त्याला अभिमान वाटे. परंतु अब्दुल आणि त्याची बायको यांना मनांत एक दुःख सलत होतें. त्यांना मुलगी नव्हती. अब्दुलच्या घराण्यांत अनेक पिढ्यामध्यें मुलगी झालीच नाहीं. त्याला मुलींची फार आवड होती. परंतु देवाने त्याची प्रार्थना कधीं ऐकली नसावी. वर्षामागून वर्षं गेलीं. पण अब्दुल आणि फातमा यांची मुलीची हौस पुरण्याचीं लक्षणें दिसेनात.

अब्दुल आणि फातमा यांचीं कुटुंबें नुकतींच धर्मांतरित झालेल्या रजपूत कुटुंबांपैकीं होतीं. तीं दोघेंही उंच, गोरींपान, आणि निर्भय अशीं जातिवंत रजपुतांप्रमाणें दिसत. त्यांच्या गरजा साध्या आणि थोड्या होत्या आणि त्यांना जीवनांत कांहीं कमी नव्हतें. एकच इच्छा अपुरी होती, ती म्हणजे मुलीची.

एके दिवशीं उन्हाळ्याच्या संध्याकाळीं फातमा थकूनभागून झोपडीच्या बाहेर, अब्दुल व मुलें शेतावरून केव्हा येतील याची वाट पाहत बसली होती. नेहमींप्रमाणें मुलीविषयींच तिच्या मनांत विचार चालू होते. दरवर्षी ती अधिकाधिक वयस्कर होत होती. लवकरच आपली प्रसवक्षमता जाणार हें निश्चित होतें. देवानें आपली ही एक इच्छा कां पूर्ण न करावी? आपण त्याकरितां वाटेल तें केलें असतें, असा विचार ती करीत आहे तोंच कोपऱ्यावर एक दरवेशीण दिसूं लागली. ती फातमाकडे येत होती. "तुला काय पाहिजे? मला दरवेशी बाया दृष्टीसमोर नको असतात. मी तुला कांहीं देणार नाहीं."

फातमा म्हणाली. " बये, पण मला कांहींच नको आहे." दरवेशीण म्हणाली, " मी तुला मदत करायला आलें आहें." फातमानें म्हटलें, " मग तूं काय मदत करणार ? जा इथून आणि मला त्रास देऊं नकोस."

" तुला कांहींच नको ?" दरवेशिणीनें विचारलें, " अहोरात्र तुला कसली तरी इच्छा वाटते कीं नाहीं ?"

फातमानें तिच्याकडे पाहिलें आणि जरा दबकत म्हटलें, " हो ! मला मुलीची इच्छा आहे. पण जिथं देवाच्याच मनांत नाहीं, तिथं तूं काय मला मदत करणार ?"

दरवेशीण हंसली आणि म्हणाली, "पोरी, तुझं म्हणणं बरोबर आहे. देवाच्या मनांत जें नाहीं तें मी काय, कुणीच देऊं शकत नाहीं. पण मी तुझं भविष्य सांगतें. त्यामुळं तुझं दुःख आणि निराशा नाहींशी होईल. तुझ्या चेहऱ्यावरून मी सांगतें कीं तुझी फार दिवसांची इच्छा सफल होईल; आणि एका वर्षाच्या आंत तुला मुलगी होईल. या खेड्यांतल्या अत्यंत देखण्या मुलींहून ती अधिक देखणी असेल. आणि तुझ्या घरांत आनंद भरून टाकील. परंतु नंतर कांहीं दिवसांनीं मात्र ती तुम्हांला दुःख देईल, कुलाला कलंक आणील. अजून पाहा, वाटतं तुला अशी मुलगी असावी म्हणून, का आपल्या चार धडधाकट मुलांवर समाधान मानतेस ?" फातमा श्वास आवरून सारें कांहीं ऐकत होती. तिचें बोलणें संपलें, तेव्हां फातमानें तिचा प्रश्न न ऐकल्यासारखें केलें; आणि भविष्यांत कोठें तरी दृष्टि लावून आपल्याशींच पण मोठ्यानें ती म्हणूं लागली, " मुलगी ! हो, मला मुलगी होणार, ती सगळ्या खेडयांत सुंदर ठरणार. मुलगी, माझी लाडकी ती." दरवेशीण पाहत होती. पण आपल्या अस्तित्वाचीसुद्धां फातमाला जाणीव नाहीं असें पाहून, ती उठून चालूं लागली आणि हळूं हळूं दृष्टीआड झाली. फातमा विचारमग्न होती आणि आपल्या भावी कन्येचें स्वप्न पाहत होती. इतक्यांत पावलें वाजूं लागल्यामुळें ती स्वप्नांतून जागी झाली. तिचा नवरा आणि तिचीं मुलें परत आलीं होतीं. तिला वाटलें, दरवेशीण आली; पण तिची निराशा झाली. ती इकडे तिकडे हिंडून दरवेशीणीचा शोध करूं लागली; पण ती सांपडेना. अबदुल आणि मुलें यांनीं विचारलें, " तूं कुणाला शोधीत आहेस ?" फातमा

म्हणाली, " दरवेशीण कुठं गेली ? वेडयासारखे पाहतां काय ! तिला शोधून आणा. ती म्हणाली, मला मुलगी होणार आहे. खूप सुंदर मुलगी ! आणखी ती कांहीं बोलली; पण त्याकडे मीं लक्षच दिलं नाहीं. अहो, तिला शोधून आणा, म्हणजे ती काय म्हणाली तें कळेल. "

मुलगी जन्माला येईल याची फातमा उत्कटतेनें वाट पाहत होती. तिला असें चुकूनही वाटलें नाहीं कीं दरवेशिणीची भविष्यवाणी कदाचित् चुकीचीही असेल. कांहीं महिने गेले. आणि फातमाची आशा अगदीं नष्ट झाली. पण अकस्मात् तिला कळून चुकलें कीं आपणांला दिवस गेले आहेत. तिच्या आनंदाला पारावार राहिला नाहीं. आणि आपल्या भोंवतालच्या माणसांनाही ती आपल्या आनंदानें उल्हसित करूं लागली. योग्य वेळीं फातमा प्रसूत झाली आणि तिला मुलगी झाली. अबदुल आणि फातमा यांच्या आनंदोत्सवांत सर्व खेड्यांतल्या लोकांनीं भाग घेतला. तें जोडपें तसेंच लोकप्रिय होतें. फातमानें मुलीचें नांव ' शरबती ' ठेवलें आणि अबदुलला जरी तें आवडलें नाहीं, तरी तो तिच्याआड आला नाहीं. जसजसे दिवस जाऊं लागले, तसतशी शुक्ल पक्षांतल्या चंद्रकलेप्रमाणें शरबती वाढत गेली. ती बाळसेदार छोकरी आतां गोंडस मुलगी दिसूं लागली. डोळ्यांतील बाहुलीप्रमाणें आईबाप तिची जपणूक करीत. दिवसभर ती बडबडे, नेहमीं हंसतमुख आणि आनंदी असे आणि खोड्या क्वचितच करी. तिचे आईवडील आणि भाऊ यांच्याप्रमाणें गांवांतलीं सर्व माणसें तिच्यावर प्रेम करीत. तिला मेवामिठाई आणि खेळणीं देत. आणि सणासुदीला कपडेही देत.

अशा रीतीनें त्या सर्व गांवाची शरबती मोठी लाडकी होऊन वाढत गेली. तिच्या कुटुंबाला तिचा अभिमान वाटे. आणि तरीही आश्चर्याची गोष्ट कीं ती बिघडली नाहीं. ही सुंदर आणि खेळकर मुलगी आतां वयांत येऊन सुंदर तरुणी दिसूं लागली. हंसरे डोळे आणि मोहक हावभाव यांमुळें ती फार आकर्षक वाटे. आईबापांची आज्ञा ती पाळी; आणि त्यांच्या शब्दाबाहेर ती जात नसे. भावांची ती जिवलग मैत्रिण होती, आणि तिचीं पावलें उमटत त्या जमिनीवरही ते प्रेम करीत. भावजयांना ती बहिणीप्रमाणें वाटे.

शरबती चवदा वर्षांची झाली, तरीही तिचे आईबाप तिच्यासाठीं वरसंशोधन करीनात. तेव्हां गांवच्या लोकांना वाटूं लागलें कीं आतां त्यांना या बाबतींत इशारा देणें जरूर आहे. चवदा वर्षांची मुलगी अविवाहित राहणें सर्व जमातीला आणि गांवाला कलंकास्पद होतें. गांवांत किती तरी मुलें तिच्या पाणिग्रहणाकरतां उत्सुक होतीं. इतकेंच काय, पण शेजारच्या गांवचीं मुलेंही तिची कीर्ति ऐकून तिच्याकरितां सर्वस्व सोडायला तयार होतीं. परंतु फातमा किंवा अबदुल यांनीं मनावर घेतलें नाहीं. आणि कुणाच्याही म्हणण्याकडे लक्ष दिलें नाहीं. शरबती स्वतः खूप आनंदी असे, आणि आपल्या वयाच्या इतर मुलींप्रमाणें विवाहासंबंधीं कधीं उत्सुकता दाखवीत नसे. तिच्यामागें अनेक प्रेमवीर होते. आणि त्यांच्याशीं ती थोड्या-फार प्रणयचेष्टासुद्धां करी. विशेषतः ती पाण्याला जेव्हां जाई, तेव्हां सकाळ-संध्याकाळ हे प्रकार चालत. खेड्यांतलीं म्हातारीं माणसें नाराजी व्यक्त करीत आणि म्हणत, "तिला असंच अविवाहित ठेवलं तर कांहीं तरी वेडंवांकडं हिच्या हातून होईल." पण तिच्या आईबापांनीं त्याकडे लक्ष दिलें नाहीं. कारण या वयांत आपल्या मुलीला दूर करण्याची कल्पना त्यांना सहन होत नसे.

असें एक वर्ष गेलें. एके दिवशीं शेतांतून येतांच अबदुलाला रोगानें पछा-डलें. त्याला खूप ताप भरला. आणि चोवीस तासांच्या आंत तो बेशुद्ध झाला. गांवच्या वैद्याला त्याच्या रोगाचें निदान करतां आलें नाहीं. आणि नेहमींप्रमाणें हा कांहींतरी ईश्वरी कोप आहे, यावर कांहीं इलाज नाहीं, असें त्यानें सांगितलें. त्या दुःखीकष्टी कुटुंबानें अबदुलभोंवतीं सतत पहारा ठेवला. ती वृद्ध पत्नी, मुलगे व सुना सर्वजण प्रार्थना करीत होतीं. त्यांना आशा वाटत होती कीं, अबदुल शुद्धीवर येईल. परंतु इतका धडधाकट अबदुल दोन दिवसांच्या आंतच कामास आला.

त्या खेड्यांत सर्वच हळहळले. कारण त्याच्याबद्दल सर्व लोकांना खूप प्रेम आणि आदर होता. गांवकऱ्यांच्या स्नेहामुळें व सहानुभूतीनें फातमा व मुलें हा जबरदस्त घाव थोडाफार सहन करूं शकलीं. पण शरबतीचा शोक अनावर होता. तिचें तिच्या पित्यावर फार प्रेम होतें. ती त्याची विभूति-

पूजाच करी. आणि त्याच्याशिवाय जगांत राहण्याची कल्पनाच तिला असह्य होई. आतां आपल्या चुकीबद्दल सौम्य शब्दांत इशारा देणारा किंवा प्रेमानें हांक मारणारा शब्द तिला ऐकूं येणार नव्हता. जग उदास आणि अंधकारमय वाटूं लागलें आणि तिच्या डोळ्यांतलें तेज कमी झालें. आईला किंवा भावजयांना घरकामांत मदत न करतां ती शून्य दृष्टीनें पाहत दिवसाच्या दिवस बसून राही. तिचे भाऊ तिला बाहेर जाऊन मैत्रिणींमध्यें जीव रमविण्यास सांगत; पण ती ऐकत नसे.

अशा रीतीनें दिवस चालले होते आणि शरबतीचें आनंदी घर दुःखानें काळवंडून गेलें होतें; पण काळानें हृदयाच्या जखमा हळू हळू भरून निघतात. शरबती पुन्हां उल्हसित झाली. आणि तात्पुरतें दूर झालेलें सुख पुन्हां जीवनांत आणण्याचा प्रयत्न करूं लागली. हळूहळू ती आपल्या मैत्रिणींत मिसळूं लागली आणि त्यांच्याबरोबर फुलें तोडण्यास व पाणी आणण्यास ती जाऊं लागली. आपल्या बरोबरच्या मुलांशीं तिच्या गप्पागोष्टी सुरू झाल्या.

एके दिवशीं संध्याकाळीं विहिरीवर ती एकटीच होती. उशीर झाला होता. आणि बहुतेक मंडळी घरीं परतली होती. तिनें घागर भरली आणि ती एका दगडावर बसली. आपल्या भविष्यांत काय आहे याचा विचार करीत किती वेळ तरी तेथेंच ती राहिली. अलीकडे आपली आई वरसंशोधन करीत आहे, आणि लवकरच आपलें लग्न होणार हें तिला कळून चुकलें होतें. पण खेड्यांतील इतर मुलींप्रमाणें ती कल्पना तिला विशेष सुखावह वाटली नाहीं. ती आपल्या लग्नाच्या गोष्टींत किंवा चेष्टामस्करींत कधीं भाग घेत नसे. तिला गांवांतील पुष्कळ मुलें आवडत. पण त्यांपैकीं एकाशींही आपलें लग्न व्हावें असें तिला वाटत नसे. गांवच्या पाटलाचा उंच आणि देखणा मुलगा सलीम हा तिचा फार आवडता होता. तो मोठा विनोदी आणि आनंदी वृत्तीचा होता आणि शरबतीला खूष करण्याचा त्याचा नेहमीं प्रयत्न असे; पण तो कांहींसा उद्धट होता आणि शरबतीला हें आवडत नसे. शांत स्वभावाचा व उद्योगी अली हाही तिचा चाहता होता. आणि त्याची तिच्यावरील भक्ति हा सर्व गांवाच्या चर्चेचा विषय झाला होता. आणखीही पुष्कळजण होते. पण त्यांपैकीं कुणालाही वरण्याची शरबतीनें इच्छा दाखविली नाहीं.

शरबती इतकी विचारमग्न होती कीं जवळ वाजलेल्या पावलांचें तिला भान नव्हतें. पुढील प्रश्नांनीं तिची समाधि भग्न झाली. " हें गोकुलपुरा गांव आहे काय ? अंधारामध्यें माझी वाट चुकली असं मला वाटतं."

शरबती चमकली ! तिनें पाहिलें, तों एक सुंदर तरुण समोर उभा. त्याचे खांदे रुंद होते. त्याचा चेहरा उमदा होता. आणि डोळे तपकिरी, मोटे, पण सौम्य असे होते. कांहीं अगम्य कारणामुळें तिला लाजल्यासारखें वाटलें आणि जागेवरून उठून थोडया कातर आवाजांत ती म्हणाली, " हो, हो. हेंच गोकूळपुर गांव. कुणाचं घर पाहिजे तुम्हाला. या गांवचीच आहे मी. तुम्ही सांगाल तिथं घेऊन जाईन. "

" या गांवचे उपाध्याय गणेशलाल यांचा पुतण्या मी. त्यांच्याचकडे मला जायचं आहे. "

शरबती हंसून म्हणाली, " मला गणेशलालजींचं तर घर चांगलंच माहित आहे. मला त्यांच्याबद्दल फार आदर वाटतो. त्यांचीही माझ्यावर फार माया आहे. माझ्या वडिलांचे मित्र होते ते. "

" म्हणजे ?" तो माणूस म्हणाला, " ते आहेत ना ? कीं—"

" नाहीं, नाहीं. ते आहेत. पण माझे बाबा वारले. " किंचित् उदास व शून्य दृष्टीनें शरबती म्हणाली. लगेच भानावर येऊन आणि उसासा दाबून ती म्हणाली, " या, तुम्ही फार थकलां असाल. गणेशदादांच्या घरीं तुम्हांला तडक नेणं बरं."

त्या माणसाला त्याच्या चुलत्याच्या घरीं पोंहचवून शरबती घरीं परतली; पण तिचे सर्व विचार (गणेशलालनें ज्याला 'आनंद' असें संबोधिलें) त्या तिऱ्हाईत तरुणावर केंद्रित झाले होते.

आनंद त्या खेड्यांत राहिला. जेव्हां जेव्हां शरबती पाण्याला जाई, तेव्हां तेव्हां आनंद त्या बाजूनें बहुधा जात असायचा. पहिल्यानें नुसतें अभिवादन करून तो जाई; पण मग तो जरा रेंगाळूं लागला आणि त्यांचीं संभाषणें होऊं लागलीं. या भेटीकरितां ती उत्सुक झालेली असे. वडिलांच्या मृत्यूनंतर प्रथमच ती नेहमींच्या जीवनांत रमत होती. ती घरकामांत दंग असे आणि दिवसभर गाणीं गुणगुणत राही.

तिच्यांतला हा बदल तिच्या आईला व भावांना बरा वाटला. पण लौकरच शरबतीच्या व आनंदच्या दररोज भेटी होतात हें त्यांच्या कानांवर आलें. भावांनीं ही गोष्ट हंसण्यावारी नेली; पण आई मात्र सचिंत झाली. तिनें गांवांतील जाणत्या लोकांचा सल्ला घेतला आणि मुलीसाठीं वर शोधून काढण्याची त्यांना विनंती केली. आनंद आणि शरबती यांना, परस्पर आपलें भवितव्य ठरविण्याच्या कारवाया चालू आहेत हें माहित नव्हतें. लौकरच एक नवरदेव सांपडला. हा अमृतसरचा राहणारा असून विधुर होता आणि त्याला पहिलीं तीन मुलें होतीं. तो वयानें चाळीस वर्षांचा होता; पण साठीला आल्यासारखा दिसे. गांवांतल्या जाणत्या माणसांनीं हा जांवई म्हणून पत्करण्याचा सल्ला शरबतीच्या आईला दिला. नवरदेव चांगला श्रीमंत व सुखवस्तु आहे आणि शरबतीला ऐषारामांत राहायला मिळेल असें त्यांचें म्हणणें होतें. तो तिच्यापेक्षां खूप मोठा आहे आणि प्रकृतीनें अगदीं पोखरलेला आहे, या गोष्टी त्यांना महत्त्वाच्या वाटत नव्हत्या !

शरबतीच्या आईनें मुलांचा सल्ला घेतला. त्यांना ती कल्पना मुळींच पसंत पडली नाहीं; पण जेव्हां त्यांना कळून चुकलें कीं शरबती इतर मुलींच्या मानानें लग्नाला मोठी झाली आहे आणि तिला तरुण वर मिळणें शक्य नाहीं, तेव्हां नाइलाजानें त्यांनीं संमति दिली. तिथिनिश्चय झाला. पण शरबतीला यांतलें कांहींच ठाऊक नव्हतें. एके दिवशीं आनंदाची गांठभेट झाल्यानें सलज्ज व आनंदित होऊन शरबती घरीं परत आली तों आईनें तिला एका बाजूला बोलाविलें आणि तिचें लग्न ठरलें असून समारंभ एक महिन्यानें वसंतऋतूच्या आरंभीं होईल असें सांगितलें. शरबतीचा चेहरा पांढरा पडला. तिच्या हृदयाचें स्पंदन जोरानें सुरू झालें आणि तें आतां फुटतें कीं काय असें वाटूं लागलें. तिचें सर्वांग थरथर कांपूं लागलें.

आईनें जरा चमकून विचारलें, "काय झालं, बेटा? लग्नाची इतकी भीति तुला वाटूं देऊं नको. जन्मभर तुला कुवार कसं राहतां येईल? तुझ्या बरोबरच्या मुलींचीं लग्नं होऊन त्यांना मुलंबाळं झालीं. धीर धर आणि आतां हा सोहळा नीट पार पाडण्यासाठीं मला मदत कर."

"आई," शरबती हलक्या आवाजांत म्हणाली, "या माणसाशीं

माझं लग्न करूं नको. कृपा कर! माझी आई ती! मला सक्ति करूं नको. नाहीं तर मी जन्माची दुःखी होईन."

"हें काय वेडयासारखं? असं कसं बोलूं शकतेस तूं? कांहीं भीड-मुर्वत आहे कीं नाहीं तुला? मी तुझ्या वडिलांना नेहमीं सांगायची कीं मुलीला फाजिल स्वातंत्र्य देऊन तुम्ही बिघडविणार आहांत. तेंच झालं पाहा." नंतर कांहीं तरी आठवल्यासारखें होऊन शरबतीची आई थोडी चमकल्या-सारखी झाली आणि शरबतीला जवळ घेऊन घोगऱ्या आवाजांत हलकेच म्हणाली, "शरबती, सारं गांव म्हणतं तें खरं नाहीं ना, तूं आणि तो हिंदु मुलगा, गणेशलालचा पुतण्या दोघं—"

"नाहीं नाहीं, आई. आम्ही कांहींच वाईट वागलों नाहीं. पण मी दुसऱ्याशीं लग्न करूं शकत नाहीं. आई, माफ कर. आनंदवरचं प्रेम तोडणं अशक्य आहे मला."

"पण पोरी, काय म्हणतेस हें? तूं मुसलमान, तो हिंदु. तुमचं लग्न होऊं शकेल असं वाटतं कसं तुला? शक्यच नाहीं. मोठाले गांवकरी याला परवा-नगी कशी देतील? खुद्द गणेशलालबाबूच याला विरोध करतील. मुली, त्याला विसरून जा आणि आतां तुझा वाङ्‌निश्चय झाला आहे. तेव्हां तूं त्याच्या भेटीगांठी घेतां कामां नये."

शरबतीला हुंदका आवरेना. आईला उत्तर न देतांच ती घराबाहेर पडली. पण आई विशेष सचिंत होऊन लगोलग गणेशबाबूकडे याविषयीं बोलणें करण्यास गेली. शरबतीचे वडील आणि गणेशबाबू एकमेकांचे परम स्नेही होते आणि त्यांचा धर्म त्यांच्या स्नेहाच्या आड कधीं आला नाहीं.

फातमाकडून सर्व हकीगत ऐकल्यावर गणेशबाबू खालीं मान घालून स्वस्थ बसले. फातमाला वाटलें, लज्जेमुळें ते असे बसले असतील; पण वास्तविक दुःखामुळें त्यांना वर पाहवत नव्हतें.

"बेहेन!" गणेशबाबू म्हणाले, "शरबती आणि आनंद दोघंही फार चांगलीं आहेत आणि त्यांना लग्न करतां आलं असतें तर सोन्याहून पिवळं झालं असतं; पण आपल्या रूढी आणि परंपरा या गोष्टीला संमति देणार नाहींत. वाईट वाटतं! याला आतां काय तोड काढावी? मी या

दोघांही मुलांना चांगलीं ओळखतों आणि उभयतांचं लग्न न झालं तर त्यांना किती वाईट वाटेल याची मला जाणीव आहे. पण मी काय करूं शकणार ? त्यांचं लग्न होणं शक्य नाहीं. तेव्हां आनंदला दूर धाडून देणं हा एकच मार्ग शिल्लक उरतो. शरबती लहान आहे. लौकरच हें दुःख ती विसरून जाईल. ”

शेवटीं हेंच ठरलें. आनंदच्या इच्छेविरुद्ध त्याला शरबतीचा निरोप घेऊन दुसऱ्याच दिवशीं तें गांव सोडावें लागलें.

शरबतीच्या लग्नाची तयारी जोरांत सुरू झाली. गांवांतल्या बायका येऊन सारी सिद्धता करण्याची कोशीस करीत होत्या. अखेर तो आनंदाचा व उल्हासाचा समजला जाणारा लग्नदिवस उजाडला. पण शरबतीच्या अंतःकरणांत आनंद नव्हता. सुंदर वधूवेषांत ती निर्जीव बाहुलीसारखी बसली होती आणि मैत्रिणींच्या चेष्टा-विनोदानें तिला हंसूं येत नव्हतें.

समारंभ संपला. जड अंतःकरणानें फातमानें मुलीला निरोप दिला आणि देवानें तिला सुखात ठेवावें अशी तिनें परमेश्वराची मनोभावें प्रार्थना केली.

× × ×

शरबती पहारेकऱ्यांच्या बंदोबस्तांत आरोपीच्या पिंजऱ्याकडे जाऊं लागली. सर्व न्यायगृह आज अनोळखी आणि करड्या दिसणाऱ्या माणसांनीं फुलून गेलें होतें. दोन वर्षांत शरबती खूप बदलेली होती. ती पूर्वीची गोंडस, हंसतमुख, तेजस्वी डोळ्यांची ग्रामकन्या राहिली नसून सडसडीत, कठोर, बेपर्वा, अशी स्त्री दिसत होती. पुष्कळशा स्त्री-आरोपी अगणित डोळे आपणांकडे लागले आहेत या भीतीनें जशा माना खालीं घालून जातात, तशी ती गेली नाहीं. तिची मान ताठ होती आणि तेथील जमाव, कायदेपंडित, जेलर, यांपैकीं कुणालाही ती घाबरलेली दिसत नव्हती. प्रश्नाच्या अपेक्षेनें ती आरोपींच्या पिंजऱ्यांत उभी होती. “तीन वेळा नवऱ्यावर विषप्रयोग केल्याचा” तिच्यावर आरोप होता. तिच्यासमोर भडकलेल्या चेहऱ्याचा माणूस बसला होता. तो तिचा पति असून त्याला ठार मारण्याच्या प्रयत्नांत ती फसली होती. दूर तिचे भाऊ तिला उभे असलेले दिसले. आपल्या बहि·

णीचें काय होणार याविषयीं त्यांच्या चेहऱ्यावर चिंता दिसत होती. हा देखावा पाहण्यास तिची आई जिवंत नव्हती हें एकपरीनें बरेंच झालें होतें म्हणावयाचें !

न्यायालयांत न्यायाधीश येऊन स्थानापन्न होतांच सर्व गडबड एकदम थांबली. सरकारी वकील शरबतीला उद्देशून म्हणाले, " हा माणूस तुझा पति आहे काय ? " त्या वृद्ध माणसाकडे त्यांनीं बोट केलें.

" होय. " उत्तर आलें.

" याला विष घालण्याचा तूं पुनः पुनः प्रयत्न केलास कीं नाहीं ? "

" होय. " तसेंच तुटक उत्तर आलें.

" असें करण्याची तुला कां इच्छा झाली ? "

" कारण तो मला क्रूरपणें वागवी. "

" तुला तुझ्या प्रियकराबरोबर राहायचें होतें म्हणून याला ठार करायचें होतें ना ? "

" नाहीं. " शरबती म्हणाली.

" मेहरबानी करून सविस्तर उत्तर दे. " वकील म्हणाला, "अशीं तुटकपणें उत्तरें देशील तर तुझी शिक्षा वाढवून मात्र घेशील. " पण शरबती पूर्ववत् उदास आणि स्तब्ध राहिली. नंतर तिचा वकील पुढें झाला आणि प्रश्न विचारूं लागला.

" मला कांहीं बोलण्याची इच्छा नाहीं. "

" पण तुला बोललंच पाहिजे. " वकिलानें सांगितलें, " तुझ्यावर खटला चालू आहे. तुला उत्तरं दिलींच पाहिजेत. नाहीं तर ते तुला उत्तरं द्यायला लावतील. शरबती, तूं मला सांगितलीस तशी त्यांना तुझी सर्व सविस्तर हकीगत सांग. "

पहिल्यानें शरबती गप्प होती. मग तिनें मान उचलून वकिलाकडे पाहत आणि इतर सर्व माणसांकडे पाठ फिरवून खोल, अस्पष्ट आवाजांत बोलण्यास सुरुवात केली. " माझ्या आईनं मी 'नको नको' म्हणत असतां या माणसाशीं माझं लग्न केलं आणि मी अमृतसरला गेलें. पहिल्याच दिवशीं माझा नवरा क्रूर आहे आणि मलाच नव्हे तर आपल्या मुलांना व आपल्या हाता-

खालच्या सर्व माणसांना निष्ठुरपणें वागवतो असं मला कळून आलं. जरा त्याच्या मनाविरुद्ध कुणी गेलं, किंवा जरा कांहीं कारण घडलं कीं त्यानं हात उगारलाच. तो मुलांना निर्दयपणं ठोक देई. तो रोगी आहे असं मला कळून आलं. आणि म्हणून त्याच्या स्पर्शाची मला घृणा वाटूं लागली. यामुळं तो खवळला. तो मला आणि माझ्या तारुण्याला शिव्या देई. माझ्याशीं धसमुसळेपणानं वागण्यांत आणि माझ्या अंगावर वळ उठविण्यांत त्याला फार आनंद होई. जितकं त्यानं मला वाईट वागवावं, तितकी मी त्याच्यापासून दूर राहण्याचा प्रयत्न करीं. दोन वर्षं कुरकुर न करतां असा छळ मीं सहन केला."

"एके दिवशीं तो बाहेरून आला आणि मला म्हणाला, 'शरबती, एक पाहुणा आणला आहे मीं. माझ्या एका जुन्या दिवंगत मित्राचा मुलगा आहे तो. त्याचा बाप आणि मी मोठे दोस्त होतों. तूं त्याला भेटावंस असं मला वाटतं. ये तयार होऊन.' मी त्याप्रमाणं आलें, पण नंतर मला पश्चात्ताप झाला; कारण माझ्यासमोर उभा असलेला तो माणूस दुसरा कुणी नसून आनंदबाबूच होता. माझ्या नवऱ्यानं माझ्याकडे भेदक नजरेनं पाहिलं आणि माझ्या चेहऱ्यावरची उमटलेली आरक्तता व आनंदबाबूंच्या चेहऱ्यावरील पांढुरपणा पाहून म्हटलं, "तुम्ही एकमेकांना ओळखत होतां काय ? शरबती, हें तूं मला पहिल्यानं कां सांगितलं नाहींस ? का लग्नापूर्वी हा आपला प्रियकर होता हें सांगायला घाबरलीस ? तूं माझ्याशीं रुक्षपणं कां वागत होतीस याचं कारण मला कळून आलं आणि माझी भीति खरी ठरली."

"गप्प बसा." आनंद म्हणाला, "तुम्ही जें सूचित करीत आहां तें खोटं आहे. आमच्यांत कधींच तसलं कांहीं नव्हतं. शरबतीची माझी थोडी ओळख होती आणि आम्ही कांहीं वेळ एकमेकांशीं बोललों आहोंत, इतकंच."

"'इतकंच!' कुत्सितपणं माझा नवरा म्हणाला, 'अरे, कुतरड्या, इतकंच म्हणतोस काय ? कांहीं झालं तरी ती माझी आतां बायको आहे. आणि ती मला अजून बधत नाहीं, तुझं सारखं स्मरण करते. यासाठीं मीं काय केलं आहे तें पाहा.' त्यानं मला पुढं ओढलं आणि माझ्या पाठीवरचा

कपडा फाडून त्यावरील वळ आनंदला दाखविले. आनंदला तें सहन झालं नाहीं; त्यानं माझ्या नवऱ्याला एक टोसा लगावला आणि तो घराबाहेर पडला. पण यानंतर मला मात्र जीवन असह्य झालं. मला छळण्याच्या नव्या नव्या युक्त्या माझा नवरा दररोज शोधून काढी. त्यानं मला मारावं, उपाशी ठेवावं, आणि दिवसभर टोमणे द्यावेत हें मला सहन होईना. आणि एके दिवशीं मी त्याला विष द्यायचं ठरविलं. गड्याकडून कांहीं विषारी वनस्पती आणून मीं त्या नवऱ्याच्या अन्नांत मिसळल्या. तो लगेच आजारी पडला पण त्यानं तात्काळ डॉक्टरला बोलावणं धाडलं आणि डॉक्टरनं येऊन त्याला बरं केलं; बरा झाल्यावर त्यानं मला कोंडून ठेवलं आणि तो अधिक क्रूरपणा करूं लागला. प्रत्येकजण मला सहानुभूति दाखवी आणि त्याचा द्वेष करी. कांहीं महिन्यांनीं नोकराच्या मदतीनं पुन: नवऱ्यावर मीं विषप्रयोग केला. याही वेळीं तो वांचला. त्यानं पोलिसाच्या ताब्यांत मला देण्याची धमकी दिली, पण तसं केलं मात्र नाहीं. त्याऐवजीं छळणुकीचे नवे प्रकार त्यानं शोधून काढले. माझं शरीर मारानं झालेल्या जखमांमुळं ठणकूं लागलं. पुरेसं अन्न न मिळाल्यामुळं फार अशक्तता वाटूं लागली. एके दिवशीं घराच्या त्या तुरुंगांतून मी पळालें. एका नोकराला पैसे चारून कांचांचे मी तुकडे जमवले आणि ते नवऱ्याच्या अन्नांत कालवले. घरीं येऊन दाराआड लपलें आणि नवऱ्याच्या जेवणावर लक्ष देऊं लागलें. हा आतां तरी वांचूं नये अशी देवाची प्रार्थना मीं केली. लौकरच त्याला बरं वाटत नाहीं व तो आंचके देत आहे असं दिसलं. त्याच्यावर प्रेतकळा दिसूं लागली आणि तो खालीं पडला. तो मेला अशी खात्री वाटून मी घरांतून बाहेर पडलें. इतक्यांत नवऱ्याचा एक मित्र घरांत शिरत होता, त्याला चुकवून मी पळालें. कांहीं तरी विपरीत आहे असं वाटून त्यानं तिथून जाणाऱ्या-येणाऱ्यांना मला पकडायला सांगितलं आणि तो माझ्या नवऱ्याकडे गेला. त्यानं डॉक्टरला बोलावून आणलं आणि पोलिसांनाही वर्दी दिली. पोलिस आले. त्यांनीं माझ्या नवऱ्याचं जेवण अर्धवट पडलेलं पाहिलं आणि तर्क केला कीं यावर विषप्रयोग झाला आहे. मला अटक करण्यांत आली. अशी माझी सारी हकीकत आहे."

कांहीं वेळ कोर्टांत स्तब्धता होती. नंतर कुजबूज सुरू झाली. आवाज वाढत गेला, तेव्हां न्यायाधीशांना करडेपणानें ओरडून शांतता ठेवण्याबद्दल

सांगावें लागलें. शरबतीला ७ वर्षें सक्तमजुरीची शिक्षा होऊन बालगुन्हेगारांच्या तुरुंगांत पाठविण्यांत आलें. जशी ताठ मान करून ती न्यायगृहांत शिरली होती, तशीच ती बाहेर पडली. गेलीं दोन वर्षें ती जें खडतर जीवन कंठीत होती त्यापेक्षां कुठला तुरुंग आणखी वाईट असणार ? त्यामुळें शिक्षेचें तिला कांहींच वाटलें नाहीं. आपण जें केलें त्याविषयीं तिला खंत वाटत नव्हती. सक्तीनें ज्याला नवरा म्हणावें लागत होतें, त्या प्राण्याबद्दल तिला भयंकर तिटकारा वाटत होता.

तुरुंगाची गाडी हलके हलके हलके जात तुरुंगाशीं थांबली. लोखंडाचें लहान फाटक उघडलें आणि शरबतीला आंत घेण्यांत आलें. नेहमींप्रमाणें झडतीचा उपचार झाल्यावर शरबतीला तुरुंगाचे कपडे देण्यांत आले. मग पहारेकरिणींनीं तिला आत नेलें. तो प्रचंड काळा दरवाजा बंद झाला आणि शरबतीची आणि बाहेरच्या जगाची फारकत झाली. तें जग दृष्टीआड होतांना शरबतीला हुंदका आला. पुनः आपण त्या जगात जाऊं शकूं का ? ती विचार करूं लागली. आपलें जुने घर आणि भाऊ पुनः दिसतील का पुन: आपल्याला ? का जिथें प्राणवायु सुद्धां मिळत नाहीं अशा या दुष्ट तुरुंगाच्या मिठींत आपलें तरुण जीवन पिचून जाईल ? तिचीं पाउलें अडखळलीं; पण पहारेकरिणींनीं आपल्या जबरदस्त हातांनीं तिला पुढें लोटलें. दुःखभयानें व्याप्त असलेल्या हृदयानें खाली मान घालून बिचारी शरबती पहारेकरिणींनीं दाखविलेल्या कोठडींत शिरली. येथेंच तिच्या जीवनांतलीं उत्कृष्ट वर्षें तिला काढायचीं होतीं. हीं वर्षें संपवून जर ती वांचलीच, तर पूर्वीचा सौम्यपणा व सौंदर्य मावळून ती बहुधा बनेल गुन्हेगारीण होणार आणि पुनः पुनः या ना त्या तुरुंगांत जाणार आणि हें सर्व कां ? ती जन्मजात गुन्हेगार होती म्हणून ? छे छे ! रूढी आणि परंपरा यांमुळें आपणाला आवडलेल्या माणसाशीं तिला लग्न करतां आलें नाहीं यासाठीं !

सर्व कैदी कोंडले गेले. स्त्रियांच्या तुरुंगांत सर्वत्र सामसूम झालें. इतर कैदी स्त्रिया रात्रीचें अंथरूण-पांघरूण करूं लागल्या. राजबंदिनींनीं पुस्तकें, विण-काम हातीं घेतलें आणि दिवसाचा उरलेला तो कंटाळवाणा वेळ कसा तरी त्या घालवूं लागल्या. सायंकाळीं पांचाचा सुमार होता आणि उत्तर हिंदु-स्थानांतल्या कडक उन्हाळ्याची धग थोडी कमी होऊं लागली होती. सर्व दिवस कोठड्या खुल्या असूनही कुणी बाहेर पडत नसत; कारण उन्हांत फिरणें असह्य होई आणि जमीन तर इतकी तापे कीं चपलांच्या तळव्यांतून पायाला चटके बसत. पण साध्या कैदी स्त्रियांना चपला घालण्याची परवानगी नसे. आणि थोडासा थंडावा येऊं लागला कीं राजबंदिनी तशाच कैदी स्त्रियांना तुरुंगाच्या नियमाप्रमाणें कोठड्यांतून कोंडण्यांत येई. या कोठड्या भट्टी-सारख्या तापलेल्या असत.

एक दिवस कोठड्या अशा बंद होऊन एक तास लोटला होता. कोठड्यांतून येणाऱ्या मंद व ठरींव आवाजाखेरीज सर्वत्र सामसूम होतें. इतक्यांत तुरुंगाचें बाहेरचें फाटक उघडलें. बिजागिऱ्यांचा नेहमींचा आवाज ऐकूं आला आणि कोण आलें अशा उत्सुकतेनें कैदी स्त्रिया पाहूं लागल्या. एकाद्या राजबंदिनीच्या सुटकेचा हुकूम आला असेल किंवा एकादी नवी कैदी आली असेल असें सर्वांना वाटलें. सर्वजणी गप्प झाल्या आणि सर्वांचे डोळे फाटकाकडे लागले. इतक्यांत त्या स्तब्धतेचा भंग करणारी किंचाळी उठून पुढील शब्द ऐकूं आले “ अग अवदसे, मला जाऊं दे. मी जरी प्यालेली असलें तरी मला नीट जातां येईल. असं मला तुझ्या-सारख्यांनीं नेहमीं हाताळणं आवडत नाहीं. घाणेरडी—” वॉर्डर बाईनें आंतलें फाटक उघडलें. सर्वांनीं नीट पाहिलें तों एक बाई मोठमोठ्यानें तोंडा-वर हात मारून सारखी कोकलत होती. मुख्य अधिकारी बाईनें तिला एक

चपराक ठेवून दिली. ती इतकी पिऊन धुंद होती कीं तिला कांहीं प्रतिकार करतां येत नव्हता. दोन्हीं बाजूंनीं वॉर्डर बायांनीं तिला धरून खेचीत चालविली होती. पण तिच्या तोंडांतून निघणाऱ्या शिव्यांनीं चांगल्या इरसाल गुन्हेगारीण बाया सुद्धां गडबडून गेल्या.

" गप्प बस. " मुख्य अधिकारी म्हणाली, " नाहीं तर जीव घेईन, घाणेरडे ! तुझे वेडेचार पुष्कळ पाहिले आहेत मीं. आतां मात्र जेलच्या बाहेर पडण्याच्या पूर्वी तुला नीट ठिकाणावर आणीन, अर्थात् जिवंत बाहेर पडलीस तरच."

तिला अधिकारी स्त्रीनें एका एकीकडील खोलींत ढकललें. ती भुईवरच पडली. मग त्या स्त्रीनें दाराला कुलुप ठोकलें. अधिकारी स्त्री इतकें झाल्यावर राजबंदिनींकडे वळली. एकदम लाघवी व उदार अशा वृत्तीनें ती म्हणाली, " बयांनो, तुम्हाला अशा रीतीनं अवस्थ करावं लागलं याचं वाईट वाटतं. पण पाहिलीत ना बाई कशी द्वाड आहे. हिला चोप दिला नसता, तर या राक्षसिणीनें माझे डोळे बाहेर काढले असते. तिच्याशीं कुणी बोलूं नका. तिच्याजवळ सुद्धां जाऊं नका. ती तुम्हांला इजा करील, शिव्या देईल आणि मग मला तिला चोप द्यावा लागेल. "

" ती देऊं दे शिव्या." एक राजबंदिनी म्हणाली, "पण गजाच्या आडून ती आम्हांला दुखापत कशी करणार ? आणि बाई, तुम्हीं तिला मारतां त्याऐवजीं ममतेनं कां नाहीं वागवत ? "

"पोरी, काय म्हणतेस हें तूं ?" अधिकारी स्त्री म्हणाली, "ही बया माणूस आहे का ? ती जनावर आहे, जनावर ! शुद्ध रानटी. तिला बेड्याच घातल्या पाहिजेत आणि तरी सुद्धां ती कमी ताप देईल अशी खात्री नाहीं. "

या स्त्रीशीं युक्तिवाद करणें फुकट आहे हें राजबंदिनींनीं जाणलें आणि त्या गप्प बसल्या. मोठ्या तोऱ्यांत अधिकारी स्त्री निघून गेली.

बराच वेळ ती नवी कैदी कण्हत, विव्हळत, आणि आपल्या स्वतःशीं बडबडत पडली होती. मग नुसत्या थकव्यानेंच तिला झोंप आली. पुढें रात्रभर सामसूम होतें. तासातासाला 'आंत सर्व 'आलबेल' आहे' असें ओरडून सांगणाऱ्या वॉर्डर बायांच्या शब्दांनीं शांतता भंगे, तेवढीच.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सर्व कैद्यांच्या कोठड्यांचीं दारें उघडण्यांत आलीं. नवी कैदी स्त्री मोली मात्र कोंडलीच होती. आपल्या कोठडींत दांतओंठ खात चरफडत बसली होती. कुणी जिज्ञासेनें तिच्या कोठडीजवळ आलें कीं, ती खेंकसे. जुन्या कैद्यांपैकीं बऱ्याच जणीं तिला ओळखत असाव्या असें दिसलें. पुष्कळदां या तुरुंगांत ती आलेली होती. या तुरुंगांचा तिला चांगला परिचय होता. कांहीं कैदी तिच्या कोठडीवरून जातांना तिला स्वागत-पूर्वक म्हणत, " राम राम, मेमसाब. " कांहीं टिंगलखोरपणें तिला बोलत, " अहा, तुम तो बडी मेमसाब बन गयी! कहां से ये कपडे चोरा लाई हूं ? " मोली त्यांच्याकडे दुर्लक्ष करी आणि गप्प बसे. पण डोळ्यांत मात्र एक द्वेषाची चमक येऊन जाई. आठ वाजतां मुख्य अधिकारी एकंदर पाहणी करण्यास आली. मोलीची कोठडी तिनें टाळली. पण ती कसली आपल्याकडे दुर्लक्ष करूं देते ?

" हं, आलीस का बाई ? तुला मी घाबरलें असं समजूं नको. तूं माझीं हाडं मोडलींस तरी त्यांचे तुकडे जुळून तुला छळतील ! हा हा हा ! बाई, तूं पाहणी करीत चालली आहेस आणि माझ्या हाडांचे तुकडे तुझ्या मागं लागले आहेत हें किती गमतीदार दिसेल, देवा ...हे..." आणि मोली पिसाटासारखी हसूं लागली. रागानें संतप्त होऊन अधिकारी बाईनें मोलीची खोली उघडून एक चाबूक आणण्यास फर्माविलें. अशा रीतीनें सज्ज होऊन अधिकारी दोन वार्डर बायाना घेऊन मोलीला योग्य असलेली शिक्षा देण्यास पुढें घुसली; पण ती कोठडींत गेली तोंच दोन राजबंदिनी पुढें सरसावल्या, " बाई, कृपा करून या स्त्रीला मारूं नका. तिचं डोकं ठिकाणावर नाहीं. मारून काय होणार ? या वेळीं सोडून द्या तिला. "

" हें पाहा, पोरींनो, " अधिकारी म्हणाली, " माझ्या येथल्या कामांत तुम्हीं ढवळाढवळ करायची नसते; तुम्ही आपलं वाचन किंवा दुसरं जें असेल तें चालूं द्या आणि माझ्या शिस्तीप्रमाणं माझ्या कैद्याशीं मला वागूं द्या. पण मी पाषाणहृदयी नाहीं हें तुम्हांला पटावं याकरितां मोलीला मी या वेळीं सोडून देतें. " इतकें बोलून ती मोलीकडे वळली. चाबूक पाहून मोली कोपऱ्यांत रडत भेकत बसली होती. " हें पाहा मोली, या बायांना

खर्च करण्यासाठीं या वेळीं मी तुला सोडून देत आहें. पण ही पहिली आणि शेवटचीच वेळ, बरं का ? पुढच्या वेळेला आपलं घाणेरडं तोंड उघडलंस, तर निकाल लावीन तुझा."

अधिकारी बाई निघून गेली. वॉर्डर बाया त्या दोन राजबंदिनींकडे तिरस्कारानें पाहत होत्या. या दोन मुलींनीं त्यांच्या आजच्या सकाळच्या करमणुकींत व्यत्यय आणला होता ना ?

मुलीहि परतल्या. साडेअकराला पुनः साध्या कैद्यांना कोंडण्यात आलें. त्या चारपर्यंत कोंडल्या राहायच्या. पुनः तास दोन तासांकरितां त्यांना बाहेर काढण्यांत येई आणि मग रात्रीकरितां पुनः त्यांना कोठडींत टाकण्यांत येत असे. फक्त राजबंदिनींना त्यांच्या आवारांत फिरण्याची मोकळीक असे. पण त्यांनाहि शेजारच्या आवारांत ठेवलेल्या राजबंदिनींकडे जाण्याची किंवा त्यांच्याशीं बोलण्याची परवानगी नसे.

त्या दिवशीं जेलमध्यें सर्वत्र सामसूम झाल्यावर मोली आपल्या कोठडीच्या गजापर्यंत आली आणि मोठ्यानें कुजबुजत म्हणाली, "ए पोरींनो ! मला तुमच्याशीं बोलायचं आहे ग." कांहीं राजबंदिनींनीं तिचें बोलणें ऐकलें आणि त्या तिच्याकडे जाऊं लागल्या. मोलीनें मान हलवीत म्हटलें, "तुम्ही नाहीं. सकाळीं त्या कैदाशिणीपासून ज्या दोघी मुलींनीं मला सोडविलं, त्या पोरी." मोलीनें उल्लेख केला त्या मुली पुस्तकांतून डोकें काढून मोलीकडे पाहूं लागल्या. मोली त्यांना म्हणाली, "या, मेहरबानी करून या, मला तुमच्याशीं बोलायचं आहे." त्या दोघींतली एक मुलगी म्हणाली, "काय ग ? तुझी ओळख करून घ्यावी असा कांहीं चांगुलपणा आहे का तुझ्यांत, मोली ? मुळींच नाहीं. म्हणून तुझ्याशीं मैत्री करणं अन् बोलणं नको वाटतं. हव्या त्या क्षणीं तूं मला शिव्या द्यायला लागायचीस."

"ये ग पोरी." मोली हंसून म्हणाली, "तुझ्यासारख्या गोजिरवाण्या मुलीला मी कधीं दुखवणार नाहीं; शिवाय बाया म्हणतात तशी मी नाहीं. पुरुषांनीं माझा सत्यानास करीपर्यंत मी मोठी सभ्य स्त्री होतें. मोली कूपर हें माझं नांव. ग्लॅडिस् कूपर म्हणून जी सिनेमा नटी आहे, ती माझी दूरची चुलत बहीण लागते."

ती मुलगी काहीं उत्तर देईना असें पाहून मोलीच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. " असं ? तूंहि मला वाईट समजतेस तर. पण मी तशी नाहीं. प्रतिज्ञेवर सांगतें मी. कृपा करून बैस आणि ऐक माझी कहाणी. "

ती मुलगी शेजारच्या दगडावर बसली. मोली अँग्लो-इंडियन् होती. ती उंच व गौरवर्ण असून तिचे डोळे तपकिरी आणि विशाल होते. केसांची फारशी निगा ठेवली गेली नसली, तरी तिचे ते मऊ तपकिरी केस सुंदर दिसत. जेलमध्येंच तयार झालेल्या जाडयाभरडया कापडाचा अँग्लो-इंडियन् पद्धतीचा झगा तिनें चढविला होता. तिच्या कृश खांद्यावर तो बराच ढिला दिसे. असें असून आणि मुद्रा तितकी स्वच्छ नसूनहि ती तारुण्यांत सुंदर असली पाहिजे हें कुणालाहि कळून आलें असतें. ती अवघी ३५ वर्षांची होती; पण त्या मानानें फार मोठी दिसे.

" पोरी, तरुण वयांत मी तुझ्यासारखी होतें. टवटवीत सुंदर चमेली-सारखी. आसपासचीं मुलं माझ्यावर फिदा असत. पण मी त्यांच्याकडे लक्ष देत नसें. माझे आईबाप गरीब पण प्रतिष्ठित होते आणि मी त्यांची एकुलती एक मुलगी होतें. मी तेरा वर्षांची असतां माझे वडील एकाएकीं वारले आणि मला जी माझी आई फार पतिनिष्ठ वाटत असे तिनं सहाच महिन्यांत एका माणसाशीं पुनर्विवाह केला ! हा माणूस तिच्यापेक्षां वयानं लहान होता. मला खेद झाला. पण काय करणार मी ? मी सावत्र बापाचा द्वेष करी. त्याला मी आवडत नसे आणि तो मला दूर ठेवी. एक वर्षानंतर आई इस्पितळांत बाळंतपणासाठीं म्हणून गेली. कांहीं कमीजास्त झालें म्हणून दहा दिवसांऐवजीं सहा आठवडे तिला तिथं रहावं लागलं. या कालांत माझा सावत्र बाप रेगी आणि मी एवढीं दोघंच घरांत होतों. पहिले कांहीं दिवस तो शांत व ममताळू असा वागला; नंतर तो विशेष माया दाखवूं लागला. मी एकटी होतें. माझ्या गळ्याभोंवतीं तो हात टाकी किंवा कपाळाचें तो चुंबन घेई. याचें मला कांहीं वाटत नसे. एके रात्रीं मी झोंपलें असतां तो माझ्या खोलींत आला आणि माझ्या गादींत शिरला. मी इतकी घाबरलें कीं श्वास घेतां येईना मला. तो माझ्याशीं गोड गोड बोलूं लागला आणि त्यानं मला बाहुपाशांत घेतलं. मी प्रतिकार करीत होतें. पण त्याचं पशुत्व जागृत झालं

आणि तूं मूर्ख आहेस, मी हवं तें करणार, असं त्यानें सांगितलं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं दुःखी, संतप्त व सलज्ज मनःस्थितींत मीं घर सोडलं आणि थकून भागून एका झाडाखालीं झोंपीं गेलें. तिथं माझ्या एका शेजारणीनं मला पाहिलं आणि परत घरीं आणलं. त्या शेजारिणीच्या समोर रेगीनं आपणाला बाईट वाटल्याचं सोंग केलं; पण ती जातांच मला त्यानं कोंडून ठेवलं आणि जर का पळून जायचा प्रयत्न केलास तर ठार करीन असा धाक घातला. मी पंधरा दिवस कोंडलेली होतें. रेगी हवा तसा माझा उपभोग घेई. मी प्रतिकार करण्याचं सोडून दिल्यानं त्यानं जरा पहारा कमी केला. दिवसभर मला मोकळेपणानं हिंडतां फिरतां येई; पण रात्रीं मला कोंडण्यांत येत असे.

" सहा आठवड्यांनीं आई परत आली. पण ती इतकी अशक्त झाली कीं तिला बिछाना सोडतां येत नसे. तिचं मूल मेलं होतं. मला वाटलं, आई आल्यावर तरी रेगी मला सोडून देईल; पण त्यानं तसं केलं नाहीं आणि मलाही तक्रार करण्याचा धीर झाला नाहीं.

" एक दिवस आई माझ्याकडे टक लावून पाहत आहे असं मला आढळलं आणि नकळत मी लाजलें. आई म्हणाली, "मोली, पोरी, तूं सुंदर दिसतेस अलीकडे. आणि चांगलं मांसहि आलं तुला. पाहिजेच होतं बाकी. बरं वाटतं मला." मी स्तब्ध राहिलें. मीही माझ्यांत झालेला बदल जाणला होता; पण कारण मात्र कळलं नव्हतं. माणसं माझ्यासारखीं दुःखीकष्टी असतां सुंदर कशीं दिसूं शकतात, मला कळेना. आणि तरीहि आई म्हणाली तें खरं होतं. रेगीशीं कधीं मी कांहीं बोलत नसे; पण त्या रात्रीं त्याला हें सांगितलं. तो मोठ्यानं हंसला आणि म्हणाला, " अर्थात् तूं अधिक सुंदर दिसतेस; पण तुला कारण माहित नाहीं, हें नको मला सांगूं." खरंच मला माहित नाहीं, असं मी म्हणतांच तो म्हणाला, " तुला बाळसं कां येत आहे, नुसती तब्बेत सुधारली म्हणून ? छे. सुंदर पोरी ! अग, जें पोर तुझ्या पोटांत वाढतं आहे त्यामुळें तुझें वजन वाढतं आहे. तुला नाहीं कळलं ? तूं एक बाळच दिसतेस मोठं झालेलं ! "

" भयानं मी कांहीं बोलूं शकलें नाहीं. किती तरी दिवस भ्रमिष्टपणानं हिंडत होतें मी. काय करावं कळत नव्हतं. मग मला एका म्हाताऱ्या

बाईची आठवण झाली. तिला आम्ही आजी म्हणत असूं. तिला लोक फार पवित्र अन् दयाळू समजत. तिला विश्वासांत घ्यावं आणि या अरिष्टांतून आपली सुटका करून घ्यावी असं मीं ठरवलं.

" मीं सर्व कांहीं तिला सांगितलं. ती म्हणाली, " बाळ, काळजी करूं नको. माझ्यावर सारं सोंपीव. मी तुला मदत करीन; पण इथून तूं माझ्याबरोबर निघून आलं पाहिजेस. " मीं कबूल केलं. आणि एके दिवशीं आम्ही दोघी एके ठिकाणीं जाण्यासाठीं गाडी पकडली. आजीनं दुसऱ्या एका बाईकडे मला नेलं आणि दोघींनीं मिळून माझ्या पोराची विल्हेवाट लावली. मी बरी झालें आणि आतां घरीं परतावं असं वाटत होतं. पण म्हातारी म्हणाली, " आतां तुला आमच्याकडे राहिलं पाहिजे. घरीं गेल्यास गर्भपाताबद्दल मला तुरुंगांत जावं लागेल. " मला दुसरा मार्गच नव्हता. तेव्हांपासून माझं जीवन अधिकाधिक बिघडत गेलं. त्या दोघां बायांनीं माझ्यावर पैसे मिळविण्यास सुरुवात केली. त्यांच्याकडे भुलवून आणलेल्या माणसाबरोबर त्या मला जायला सांगत. पहिल्यानं मी मूर्ख होतं. पुढें चांगली बनेल झालें. मी सुंदर आहें आणि पुरुषांना आकर्षूं शकतें हें मला कळून चुकलं. म्हणून माझ्या चाहत्यांकडून मी देणग्या उकळूं लागलें. त्या मीं लपवून ठेवीं. दोन वर्षं याप्रमाणं मीं केलं आणि नंतर त्या सर्व देणग्या विकून खूप पैसा केला. माझ्या देहविक्रयावर चैनीनं जगणाऱ्या त्या दोन थेरड्यांना सोडून मीं दुसरं शहर गांठलं. रेगीनं माझी जी दुर्दशा केली, तिच्यासाठीं साऱ्या पुरुषजातीचा सूड घेण्याची मीं प्रतिज्ञा केली. मी पुरुषांना वापरीं, त्यांना माझं शरीर देईं, मी त्यांच्यावर फिदा आहें असं दाखवीं आणि त्यांच्याकडून पैसे मिळाले कीं त्यांना सोडून देईं. पण त्यांना सोडण्यापूर्वी शक्यतों ऐवज मी चोरून घेईं किंवा त्यांच्या घराला अथवा खोलीला आग लावून देईं. पुष्कळ दिवस यांतून मीं वाचलें; पण एकदां मला तुरुंग दाखविण्यांत आला. आणि तेव्हांपासून पुन्हां पुन्हां मी तुरुंगांत येत आहें. मी सर्व माणसांचा द्वेष करतें आणि सर्वांना मारून टाकावंसं वाटतं; आणि त्यांना मारणं शक्य नसेल तर त्यांना जें प्रिय आहे त्याचा तरी विध्वंस करावा असा मी प्रयत्न करतें. मला जेलचं कांहीं वाटतं. इथं कांहीं खायला तरी मिळतं, बाहेर पुष्कळदां मला उपाशी राहवं लागतं. ह्या

अधिकारी बाईचा अपमान करण्यांत मजा वाटते. ती मला मारील; आणखी काय ? जीव तर घेत नाहीं माझा ती ?"

सहा महिने मोली जेलमध्यें होती. राजबंदिनी तिच्याशीं बोलत आणि माणुसकीनें तिला वागवीत. ती कांहींशी बदलली आणि पुष्कळ चांगली वागूं लागली. इतकें चांगलें वागतांना तिला यापूर्वी कुणी पाहिलें नव्हतें, सहा महिन्यांनीं तिच्या शिक्षेची मुदत संपली तेव्हां ती रडूं लागली. बाहेर जाण्याची तिची इच्छा नव्हती. कारण बाहेर जायचें कुठें ? घर ना दार. रस्यावर पडून राहण्याची पाळी तिच्यावर येणार होती. आपणाला तुरुंगांतून सोडूं नये अशी व्यवस्था करण्यासाठीं तिनें राजबंदिनींना विनविलें ! पण तें शक्य नव्हतें. तिच्या जाण्याचा दिवस उगवला. तिच्या डोळ्यांना पाणी आलें. ज्यांनीं तिला पतिताप्रमाणें किंवा जनावराप्रमाणें न वागवतां आपल्यांतीलच एक म्हणून मायेनें वागवलें होतें, त्या सर्वांचा तिनें निरोप घेतला.

—आणि मोली जगांत पुन: प्रविष्ट झाली—तिच्या सारख्यांचा जेथें उपयोग नाहीं अशा निष्ठुर, तिऱ्हाईत जगांत ती शिरली. निघतांना जेलमध्यें परत यायचा निश्चयच केला होता तिनें. कारण हें एकच स्थान असें होतें कीं जेथें तिला अन्नपाणी, निवारा मिळे. दहा दिवसांनीं रात्रीं ११ वाजतां जेलचें फाटक उघडलें आणि किंचाळत येणाऱ्या मोलीला आंत आणण्यांत आलें. तिनें एका गवताच्या गंजीला आग लावली होती. एका झोंपलेल्या इसमाला लुबाडलें होतें. हिनें आग लावलेली पाहून ओरडा करणाऱ्या एका बारा वर्षांच्या मुलाला बेशुद्ध पडेपर्यंत हिनें मारलें होतें आणि नंतर दारू पिऊन ती धुंद झाली होती.

तिची ती जुनी कोठडी उघडली गेली आणि तिला आंत ढकलण्यांत आलें. पूर्वीप्रमाणेंच कण्हत, किंचाळत ती तेथें जमिनीवर पडली. अखेर कमालीचा थकवा येऊन तिचा डोळा लागला.

मुलीच्या वाटेकडे सरला डोळे लावून बसली होती. अगदीं सकाळीं विद्यार्थ्यांच्या मिरवणुकींत सामील होण्यासाठीं लक्ष्मी घराबाहेर पडली. आणि नंतर वार्ता आली कीं, कांहीं विद्यार्थ्यांना पकडलें आहे; पुष्कळ मुलें आणि मुली जखमी झाल्या आणि कांहीं मुलगे मेले. लक्ष्मी आणि तिचें मित्रमंडळ याबद्दल कांहींच कळलें नव्हतें. अंत:करणांत चिंतेनें भग्न होऊन पण वर मात्र धीर दाखवून सरला व्हरांड्यांत येरझारा घालीत होती आणि तिच्या मैत्रिणी कुजबुजत होत्या.

इतक्यांत एक गाडी मुख्य फाटकाच्या आंत आली. गाडींतील माणसानें काय बातमी आणली आहे हें पाहण्यासाठीं सरला पुढें गेली. गाडी थांबण्या-पूर्वींच एका माणसानें तींतून उडी टाकली. त्याचे कपडे फाटलेले होते आणि त्यावर रक्ताचे डाग दिसत होते. तो भयंकर थकलेला दिसत होता.

" बेहेन, " तो म्हणाला, " इथं जवळच झालेल्या गोळीबारामुळं जखमी झालेल्या लोकांना तुम्ही आश्रय देऊं शकाल का, हें पाहायला मी आलों आहें. कांहीं मरणोन्मुख आहेत, कांहीं जबरदस्त जखमी झाले आहेत. इस्पितळं दूर असल्यामुळं यांपैकीं कोणालाही तेथपर्यंत नेतां यायचं नाहीं. तुम्ही ३०।४० गाद्या देऊं शकाल का ? मी कांहीं डॉक्टर आणि परिचारिका यांना इथं आणायची व्यवस्था करतों. "

" अर्थात् ! मी सारी व्यवस्था करतें. " सरला म्हणाली. या माणसांत लक्ष्मी असेल कीं काय अशी तिला चिंता वाटत होती; पण वेळ घालविणें शक्य नव्हतें. तिला संयम करायला पाहिजे होता. आणि म्हणून आपल्या मैत्रिणींसह काय करतां येईल तें ती पाहूं लागली. पंधरा मिनिटांच्या आंत कोचें, पलंग, इतर आसनें वगैरे सर्व अंथरुणांनीं आच्छादलीं गेलीं. तोंच विद्यार्थ्यांचा पहिला थवा तेथें आणण्यांत आला. कांहीं मोटरगाडींत

होते, कांहीं टांग्यांत होते. त्यांत विशेष जब्बर जखमा झालेले लोक उचलून नेण्यांत आले. आणि इतरांना गादीपर्यंत नेण्यांत आलें. कांहीं कण्हत होते. कांहीं गप्प होते. कांहींच्या अंगांतून भयंकर रक्तस्राव होत होता आणि ज्यांना प्रथमोपचाराची माहिती होती, ते त्यांच्या जखमा बांधीत होते. सरला प्रत्येक पथारीजवळ गेली आणि जें करतां येण्यासारखें होतें तें सर्व करून या तरुण हुतात्म्यांचें ती सांत्वन करूं लागली. डॉक्टर आणि परिचारिका आल्या आणि आपलें काम शांतपणें व चोखपणें बजावूं लागल्या. एका आसन्न तरुण माणसाजवळ सरला गेली आणि अशा क्रूर रीतीनें व अकालीं या तरुणाला मृत्यु यावा हें पाहून ती हळहळूं लागली. त्यानें आपले डोळे उघडले. आणि त्याच्या पांढऱ्या फटक चेहऱ्यावर हास्याची रेषा उमटली. " आई ! " तो कसा तरी दम घेत बोलूं लागला, " मी तिला वांचविण्याचा प्रयत्न केला......" धापा म्हणाला, " मीं तिला वाचवण्याचा प्रयत्न केला......मी तिच्यांत आणि पोलिसांत आडवा झालों. त्या वेळीं त्यांनीं रायफली उचलल्या होत्या. त्यांनीं मला मारलं... ...मला वाटलं, ती वांचली...पण—...मी पडतांना तिला खालीं येतांना पाहिलं. बहेन, मी तिला वांचविण्याचा प्रयत्न केला. " त्याच्यानें पुढें बोलवेना आणि तो हुंदके देऊं लागला. सरलेच्या हृदयाचें पाणी झालें. भीतीनें तिची गाळण उडाली. नंतर आपण काय करतों आहों हें न कळून तिनें त्या मुलाचे खांदे धरले आणि विचारलें, " कुणाबद्दल तूं विचारतो आहेस ? कोण खालीं आलं तुझ्या शेजारीं ? बोल बाळा, माझी मुलगी लक्ष्मी का...? "

" होय. " मुलगा एकदम म्हणाला, " लक्ष्मीच होती ती. " आणि पुन्हां तो हुंदके देऊं लागला. सरलेला ती सर्व खोली आपल्याभोंवतीं फिरत आहे असें वाटूं लागलें. आपण खालीं पडूं या भीतीनें तिनें अंथरुणाला धरलें. "हो, मीं धीर सोडतां कामा नये. " ती आपल्याशीं म्हणाली, " हें कदाचित् खोटंही असेल. " पण डोक्यांत एकच विचार थैमान घालीत होता. " लक्ष्मी जखमी झाली आहे, कदाचित् मेलीहि असेल. " तिचा गळा दाटून आला आणि तिला श्वास नीट घेववेना. तिला जागचें हालतांहि येईना.

"आई!" तो जखमी तरुण कसेंबसें हंसून म्हणाला, "मला वाटतं--मी आतां जाणार. तुमचा स्निग्ध हात माझ्या डोक्यावर ठेवा. मला त्यामुळं बळ येईल...मला मरायचं नव्हतं; पण मेलं तर पाहिजेच! आई, नमस्ते." त्यानें आंचके दिले आणि अखेरचा श्वास घेतला. सरलेचा हात त्याच्या डोक्यावर होताच. कांहीं वेळ काय झालें हें तिला कळलेंच नाहीं. तिनें त्या मृत मुलाचें डोकें थोपटलें, आणि दोन अश्रू तिच्या डोळयांतून गळाले.

इतक्यांत कोणी पळत पळत आलें, "सरला, धांव! लक्ष्मीला आणलं आहे; लवकर ये!"

जागेवरूनच सरला म्हणाली, "ती मेली तर नाहीं ना?"

"छे, छेः! कुणीं सांगितलं तुला? तिला लहानशी जखम झाली आहे, इतकंच." असें म्हणून त्या मैत्रिणीनें सरलेला शेजारच्या खोलींत नेलें. लक्ष्मी अंथरुणावर पडली होती. आणि तिची साडी फाटली असून, तोंडावर ओरखडे आणि धूळ उडाली होती. "मा" क्षीण आवाजांत ती म्हणाली, "खूप लढाई झाली आमची; पण लाठीमार झाला, गोळया आल्या, तरी आम्हीं जागा सोडली नाहीं. तुला आमचा अभिमान वाटला पाहिजे."

सरला मुलीच्या अंथरुणाशीं गुडघे टेंकून बसली. तिच्या डोळयांतून अश्रू वाहत होते. आपली मुलगी परत दिल्याबद्दल देवाचे फार फार आभार मानले तिनें.

× × ×

हिंवाळयांतील थंड गार पहांट होती. एका पोर्चमध्यें गाडी उभी राहिली आणि गणवेश केलेला एक माणूस खालीं उतरला. पहारेकरी झोंपेंत होता. त्यामुळें या माणसाला अशा भलत्या वेळीं येण्याबद्दल त्यानें त्या गणवेषधारी माणसाला जरा चापलें.

तो नवखा मनुष्य म्हणाला, "गप्प रे. ऊठ, मी इन्स्पेक्टरसाहेब आहें तें तुला दिसत नाहीं? माझ्याशीं नम्रपणं बोल."

"असं काय?" पहारेकरी म्हणाला, "तुझ्यासारख्या डगलेवाल्या पोलीसाला माझ्यासारख्यानं भिण्याचे ते दिवस गेले! आज गांधी-

बाबांच्या कृपेनं तुझ्यासारखे लोक तुमच्या लाठ्या, तुमच्या गोळ्या, इंग्रजी सरकार, कशालाच भ्यायचं नाहीं हें आम्हीं शिकलों आहोंत ! तेव्हां धमकी देऊं नको मला ! फक्त तुझं काम काय आहे हें सांग ! ”

इन्स्पेक्टर भडकून म्हणाला, “अरे ! दरिद्रयांनो, तुमचे मालक कॉंग्रेसवाले आहेत म्हणून वाटेल तें करून तुम्हांला विसरतां येईल असं का तुम्हाला वाटतं ? भल्या माणसा, एक दिवस तुझ्याशींही प्रसंग येईल; मग बघशील तमाशा ! जा. तुझ्या मालकिणीच्या मुलीला सांग, कीं तिला अटक करण्यांत आली आहे ! आणि मी तिला तुरुंगांत न्यायला आलों आहें ! ”

“ खतरुड माणसा !” पहारेकरी म्हणाला, “ काल तुम्हीं आणि तुमच्या मित्रानं मुलां-मुलींवर दिवसभर गोळ्या झाडल्यात त्यांतून तीं पुरेशीं बरीं झालीं नाहींत, तोंच त्यांना अटक करण्याकरितां हिंडत आहांत ! ” विला-यती सरकारच्या असल्या आज्ञा पाळणाऱ्या तुम्हांला देव शासन करो ! ” इन्स्पेक्टरला तिथेंच सोडून पहारेकरी आंत गेला.

तो आंत गेला असेल-नसेल इतक्यांत :अनेक पोलिसांच्या गाड्या फाटकाशीं आल्या आणि अनेक हत्यारबंद शिपाई त्यांतून उतरून आवरांत घुसले. अजून तें शहर झोंपलेलेंच होतें. कांहीं माणसें पहांटे उठणारीं होतीं. त्यांनीं पोलिसांना पाहिलें आणि काय होतें हें पाहण्याकरितां ते सर्व तेथें जमले. असे प्रकार कांहीं अपूर्वाईचे नसत; पण इतक्या पोलिसांची गरज काय आहे, हें कळेना ! परंतु परकीय सरकारच्या लहरी किंवा त्यांना वाटणारी खोल भीति कोण जाणूं शकणार ? ही भीति झांकण्याचा पाशवी सामर्थ्याच्या जोरावर हें निव्वळ प्रयत्न मात्र करीत !

कांहीं वेळानें लक्ष्मी कांहीं कपडे व बळकटी घेऊन बाहेर पडली. ती क्षीण दिसत होती. तिला ·दिवसाची विश्रांति मिळाली असती, तर तेवढें बरें वाटलें असतें; पण तसें कुठलें व्हायला ? आपल्या सर्व मंडळीचा तिनें हास्य मुद्रेनं निरोप घेतला ! आणि पोलिसांच्या गाडींत शिरतांना आईला म्हणाली, “ आई, मी सुखरूप राहीन बरं, काळजी नको ! ” आणि गाडी निघून गेली.

× × ×

अटकेनंतर सुमारें एक आठवड्यानें लक्ष्मी जेल सुपरिंटेंडंटच्या समोर उभी होती. जेलचा तो पहिलाच अनुभव होता आणी तिला विशेष बरें वाटत नव्हतें. तिच्या गुलाबी गालांवरची टवटवी नाहींशी झाली होती अन् डोळ्यांभोंवतीं काळीं वलयें दिसूं लागलीं होतीं.

" बरं, मुली, " सुपरिंटेंडंट म्हणाला, " मेट्रन म्हणते कीं तूं जेवण घेत नाहींस. तुला आमचं आतिथ्य आवडत नाहीं का ? का या अन्नाला तुझी हरकत आहे ? " लक्ष्मी म्हणाली, " सांगण्यासारखं कांहीं नाहीं ! "

त्याच्या चेहऱ्यावरील भावामुळें ती चिडली होती. "तुम्हीं इतर वेळेला हें कां राखून ठेवत नाहीं ?"

" हें पहा, तरुण मुली, आपण आपलीं डोकीं भडकूं देतां कामा नये. तूं आपण होऊन हें जीवन पत्करलं आहेस. आम्हीं तुला इथं बोलावलं नव्हतं किंवा तूं इथं रहावीस अशी इच्छाही नाहीं. तुला जर खुशी वाटत नसेल, तर राहतेस कशाला इथं ? तूं सहज घरीं जाऊं शकतेस ! "

" होय ? " लक्ष्मीनें विचारलें, " कशी ? "

" तुला त्रास होत असेल तर आम्ही कांहीं करणार नाहीं. शहाणपणानं वाग. गोळीबाराच्या दिवशीं तुला फार त्रास झाला, आणि अजूनहि तूं बरी झालेली दिसत नाहींस. या कागदावर सही कर आणि खुशाल घरीं जा ! "

" या कागदावर काय आहे ? आणि कशावर मी सही करायची, हें कळेल मला ? "

" छे, तसं काहीं विशेष नाहीं. सही कर, निघून जा. तूं फक्त एवढीच ग्वाही द्यायची कीं विद्यार्थ्यांच्या चळवळींत, सभांत, मिरवणुकींत आपण भाग घेणार नाहीं. अगदीं साधं आहे. कांहीं नाहीं त्यांत. "

" फार साधं आहे काय ? " लक्ष्मी कठोरपणें म्हणाली, " इतकं साधं नसतं तर बरं झालं असतं; तरी मला मदत करण्याचा प्रयत्न केल्याबद्दल मी तुमची आभारी आहें. जाऊं मी आतां ? "

" हें पहा, मुली, असा अडाणीपणा करूं नकोस. मीं तुम्हां सर्व मंडळी-बरोबर खूप समजुतीच्या गोष्टी केल्या. अलीकडे या कामामुळं माझ्या इतर

कामाला वेळच राहत नाहीं. तुम्ही तरुण लोक शांतता भंग करून आणि अभ्यास सोडून अशी आगळीक कां करतां ? तुम्हांला ताळ्यावर आणण्याकरतां फार कडक उपाय आम्हाला योजावे लागतील असं वाटतं. चांगलं शहाण्याप्रमाणं या कागदावर सही कर बरं."

"मी अशी गोष्ट करीन असं समजून माझा अपमान करूं नका ! तुम्हाला आमचीं ध्येयं, आमच्या श्रद्धा आणि आम्ही कशाकरितां झगडत आहोंत हें ठाऊक आहे. या जागेचा आम्हाला कितीहि तिटकारा वाटत असला तरी असल्या कागदावर मी सही करणार नाहीं."

"कांहीं दिवसांनीं किंवा महिन्यांनीं तूं थोडीफार वठणीवर येशील आणि मग हें सतीचं वाण तुला कसं मानवतं तें पाहीन. कदाचित् न विसरण्याजोगा एखादा धडा आम्ही तुम्हांला शिकवूं आणि मग ही राजकारणांत पडण्याची उज्ज्वल कल्पना तुम्ही सोडून द्याल. नमस्ते !"

लक्ष्मी एकही शब्द न बोलतां बाहेर पडली आणि मेट्रनच्या मागोमाग गेली. आठवडाभर कांहींच झालें नाहीं आणि बाहेरचीहि कांहीं वार्ता कळली नाहीं. एके दिवशीं संध्याकाळीं पांच वाजतां मेट्रन आली आणि तिनें सांगितलें कीं लक्ष्मीनें आपली कोठडी सोडून दुसरीकडे जावें. कारण ती कोठडी दुसऱ्या कुणाकरतां पाहिजे होती.

लक्ष्मीनें पहिल्यानें नकार दिला. पण नंतर मेट्रननें तिला सांगितलें, तिनें निमूटपणें कोठडी न सोडल्यास सक्तीनें तिला सोडावी लागेल. मेट्रननें असेंहि ध्वनित केलें कीं कांहीं गुन्हेगार कैद्यांबरोबर तिला रात्र काढावी लागेल. कारण जागेची कमतरता होती.

"मी जाणार नाहीं." लक्ष्मी म्हणाली, "मी राजकैदी आहें. आणि तुम्ही इतर कैद्यांबरोबर मला ठेवूं शकत नाहीं. तुम्हांला जर मला हालवायचंच असेल, तर इतर राजबंदिनी आहेत तिथं कां मला ठेवत नाहीं ?"

"कारण, तुला धडा शिकवायचा आहे." मेट्रन खवळून म्हणाली, "उठ, आणि माझा वेळ घेऊं नको."

पण लक्ष्मीनें हलण्याचें नाकारलें. मेट्रननें दोन पहारेकरणींना बोलाविलें आणि त्यांच्याकडून लक्ष्मीला धरून दुसऱ्या कोठडींत नेऊन आदळलें. तिचें सामान तीमध्यें फेकून देऊन तिनें कोठडीला कुलुप घातलें.

या साऱ्या प्रकारानें स्तिमित व कांहींशी भयभीत होऊन लक्ष्मी कांहीं वेळ होती तशीच पडून राहिली. काय करावें तिला सुचेना. कांहीं वेळानें कोठडीचें दार उघडलें जाऊन एका थाळींतून तिचें जेवण तिच्यापुढें सरकविण्यांत आलें. लक्ष्मी उठून बसली आणि कोठडींत इतर कोण आहे हें पाहूं लागली. भ्यालेल्या जनावराप्रमाणें थरथरत दोन स्त्रिया कोपऱ्यांत जुडी करून पडल्या होत्या. अंधार पडत होता, त्यांत ते चेहरे लक्ष्मीला अस्पष्ट दिसले आणि तिची भीतीनें गाळणच उडाली. त्यांतली एक स्त्री महारोगी होती. चेहऱ्यावर पट्टे, दांत नाहींत आणि नाकाच्या जागीं एक मासाचा गोळा! दुसऱ्या स्त्रीचे हात पाय तशा थंडींत उघडे पडलेले होते; त्यावर अनेक जखमा लक्ष्मीला दिसल्या. त्या स्त्रियांनीं लक्ष्मीकडे लक्ष दिलें नाहीं. जड निर्जीव डोळ्यांनीं त्या अंतराळांत पाहत होत्या. या स्त्रियांचें मनुष्यप्राण्याशीं फारच थोडें साम्य दिसत होतें.

गोंधळून लक्ष्मी पहारेकरिणी आहेत का पाहूं लागली. तिला भय वाटूं लागलें. थोडा धीर येण्यासाठीं माणसाचा चेहरा दिसेल तर बरें, असें तिला. वाटलें. दृष्टिपथांत कोणी दिसेना आणि तिनें खूप हांका मारल्या; पण पहारे-करीण ढुंकली नाहीं किंवा तिनें 'ओ' दिली नाहीं. ती कोपऱ्यांत बसली होती. मधून मधून दृष्टिक्षेप टाकी. पण या दोन स्त्रिया हालचाल करीनात हें पाहून तिला कांहींसा धीर आला. कित्येक तास लक्ष्मी तशीच बसून होती. नंतर झोंपेनें तिला घेरलें आणि ती आडवी झाली. किती वेळ ती झोंपली होती हें तिला कळलें नाहीं. आपणाजवळ कोणी आलें आहे असा भास होऊन ती जागी झाली.

अंधारांत प्रथम तिला कांहीं ओळखूं येईना. नंतर भोंवतालच्या परि-स्थितीची तिला कल्पना आली. एक दंतहीन चेहरा तिच्याजवळ असून तिच्याकडे पाहत आहे असें तिला आढळलें. ती भेदरून दूर व्हायचा प्रयत्न करूं लागली. पण दोन बाळवट हातांनीं तिला खांद्यावर धरून खालीं बसविलें. तिला ओरडतांही येईना. इतकें भय तिला वाटत होतें. इतक्यांत आपल्या पायाला कोणी स्पर्श करीत आहे असा तिला भास झाला. भीतीनें अर्धमेली होऊन गेल्यामुळें तिला हालतां येईना, बोलतां येईना. नंतर तिच्या लक्षांत

आलें कीं अंगावर पट्टे पडलेली ती बाई आपल्या पायांवरून हात फिरवित आहे.

डोळे मिटून लक्ष्मीनें हे विद्रूप चेहरे दृष्टीआड करण्याचा प्रयत्न केला आणि पराकाष्ठा करून ती मोकळें होण्यासाठीं धडपडूं लागली. तिनें लाथही मारली, पण व्यर्थ ! त्या बाईची मिठी अधिक घट्ट मात्र झाली. त्या विद्रूप बाया कांहीं वेळ तिच्या अंगावर थापट्या मारीत आणि मधूनच तिच्याजवळ तोंड आणीत. पण त्यांच्या तोंडून एक शब्दही बाहेर पडला नाहीं.

लक्ष्मीच्या चेहऱ्यावर घर्मबिंदु उभे राहिले. अखेर ती मोठ्यानें ओरडूं लागली आणि भोंवतालची शांतता भंग पावली. तिला वाटलें, या दोन बाया तिला मारून गप्प बसायला लावतील; पण तसें कांहीं झालें नाहीं. आणि आश्चर्याची गोष्ट अशी कीं त्या घाबरून कोंपऱ्यांत पळून गेल्या. पण लक्ष्मीनें ओरडणें व बेभानपणें स्फुंदणें चालू ठेवलें. नंतर युगासारखीं वाटणारीं तीं दहा मिनिटें गेल्यावर आवाराचें दार उघडलें आणि रातपाळीची पहारेकरीण हातांत कंदील व किल्ल्यांचा जुडगा घेऊन आंत आली.

ही पहारेकरीण इतर पहारेकरणीपेक्षां बरीच नीटनेटकी होती. लक्ष्मीच्या किंचाळ्यांनीं ती घाबरली होती. ती दार उघडून लक्ष्मीकडे आली. पण तेवढ्यांत लक्ष्मी पहारेकरणीला लाथेनें ढकलून दाराबाहेर पडली. बाहेर आवारांत ती थंडीनें गारठली होती आणि स्फुंदत होती. काय झालें असेल याचा पहारेकरणीनें अंदाज केला. आणि ती त्या दोन स्त्रियांकडे जाऊं लागली. त्यांनीं जणूं काय आतां आपल्या डोक्यावर घाव बसणार अशा भीतीनें डोळ्यांवर हात ठेविले. पण करडेपणानें नुसता हात उचलून आणि त्यांना दोन शिव्या हांसडून पहारेकरीण खोलीबाहेर पडली आणि तिनें कोठडीला कुलुप लावून घेतलें. तिनें दुसऱ्या पहारेकरणीस बोलाविलें व तिच्याकडून मेट्रनलाहि बोलावून घेतलें. मेट्रननें लक्ष्मीला दुसऱ्या आवारांत नेऊन राजबंदिनींच्या ताब्यांत दिलें.

कांहीं दिवस लक्ष्मी भूतबाधा झाल्यासारखी वागत होती. तिला सांगावें तें एक शब्दही न बोलतां ती करी. एखाद्या भेसूर स्त्रीकैदीचें दुरून जरी दर्शन झालें, तरी तिला भीतीनें हुडहुडी भरे आणि डोळ्यांत अत्यंत

कारुण्यपूर्ण अशी भीतीची छटा दिसूं लागे. ही तिची नेहमीं अवस्था पाहून कांहीं राजबंदिनींनीं याविषयीं जेलच्या मुख्याधिकाऱ्याला कळविलें. तो आला. त्यानें लक्ष्मीला पाहिलें आणि त्यालाही धक्का बसला. दोन दिवसांनीं लक्ष्मीच्या सुटकेचा हुकूम झाला. मेट्रन हंसतच आवारांत आली आणि तिनें लक्ष्मीला आपल्या सामानाची बांधाबांध करण्यास सांगून म्हटलें "जा. आतां खुषींत तुला घरीं जायचं आहे!" एखाद्या बाहुली-प्रमाणें ती वागत होती. इतरांच्या मदतीनें तिनें सर्व तयारी केली. आणि आपल्या मैत्रिणींना प्रणाम करून मेट्रनबरोबर ती जेलबाहेर आली.

मेट्रननें तिच्या आईला तिच्या सुटकेची खबर दिलीच होती. ती मोठ्या उत्कंठेनें आपल्या मुलीची वाट पाहत होती. टांगा घराजवळ पोहोंचतांच लक्ष्मी टांग्यांतून उतरली आणि पोर्चमध्यें वाट पाहत असलेल्या आईकडे धांवत गेली. आईनें तिला मिठी मारली. किती वेगळी दिसत होती लक्ष्मी! पूर्वीची आनंदी, उत्साही मुलगी कुठें! आईला हा बदल पाहून अत्यंत दुःख झालें.

"आई!" लक्ष्मी स्फुंदत होती. आई दूर जाईल कीं काय अशा भीतीनें लक्ष्मीनें तिला घट्ट धरलें होतें. "आई, अग आई!" एवढेच उद्गार तिला काढवत होते. आनंदाचे आणि सुटकेचे अश्रू तिच्या कोमल मुद्रेवरून वाहत होते.

जिल्ह्याच्या तुरुंगासमोर माणसांची गर्दी जमली होती. कांहीं दिवसांपूर्वी पकडलेल्या तरुण मंडळींना आज शिक्षा होणार होती. त्यांचा गुन्हा काय होता, तर एका बेकायदेशीर संस्थेचे ते सदस्य होते. रस्त्यांतून शांततेनें एक मिरवणूक काढली, तीच ती बेकायदेशीर संस्था. लोकांवर घातलेल्या कांहीं निर्बंधांच्या निषेधासाठीं ही मिरवणूक काढण्यांत आली होती.

जेलच्या आंत मुख्य अधिकाऱ्याच्या लहान कचेरींत बारा तरुण माणसें आरोपी म्हणून बसलीं होतीं. त्यांचा खटला चालू होणार होता. पण अजून न्यायाधीशच आला नव्हता. ती तरुण मंडळी हंसत आणि गप्पा गोष्टी करीत वेळ काढत होती. खटल्याचा निकाल काय होतो याचें कुणालाही कांहीं वाटत नव्हतें. इतक्यांत तुरुंगाच्या दाराशीं एक मोटर उभी राहिली आणि खादीचीं वस्त्रें परिधान केलेल्या ४ मुली तींतून उतरल्या. त्यांपैकीं एकीनें पहारेकऱ्याला आंत जाण्याची परवानगी मागितली. त्यानें लगेच त्यांना 'पास आहे का ?' म्हणून विचारलें आणि त्या मुलीनें तो दाखविला. तरीहि तो फाटक उघडण्याविषयीं नाखुषी दाखवूं लागला. कचेरींतील इतर कारकुनांना विचारून आणि इतर पहारेकऱ्यांचा सल्ला घेऊन मोठ्या नाखुषीनें त्यानें फाटक उघडलें. मुली आंत आल्या आणि त्या तरुण मंडळींनीं त्यांचें मोठ्या उत्साहानें स्वागत केलें. त्यांनींही त्या तरुणांना उलट अभिवादन केलें. कांहीं वेळ ती मंडळी एकमेकांशीं बोलण्यांत दंग झाली. इतक्यांत पहिरेकऱ्यानें 'हुश्शार' असें म्हटलें, तेव्हां न्यायाधीश आले असें सर्वांना कळून चुकलें. मुली जमिनीवरच बसल्या.कारण त्यांना खुर्च्या देण्यांत आल्या नव्हत्या. आरोपी एकत्र बसले होते. त्याच्याजवळच पण थोड्या अंतरावर मुली आणि त्यांचे नातेवाईक बसले होते. दारें वाजलीं, शृंखला खळाळल्या, न्यायाधीशाचें जेलच्या अधिकाऱ्यांनीं मोठ्या संतोषानें स्वागत

केलें. पुढें शिपाई आणि त्यामागून न्यायाधीश असा तो सरंजाम तेथें येऊन पोहोंचला. न्यायाधीशानें तेथें येतांच सर्वांकडे एक तुच्छतानिदर्शक दृष्टि टाकली.

टेबलाशीं बसल्याबरोबर समोरील कागद त्यानें चाळण्यास सुरुवात केली. उंच, तरतरीत, करड्या चेहऱ्याचा असा न्यायाधीश होता. त्याच्या उच्चारांत ऑक्स्फर्डची ढब होती. त्याचा वेष विशेष परदेशी पद्धतीचा होता असें नव्हे. त्या खादीधारी युवकांकडे कधीं अर्धवट विनोदाच्या आणि अर्धवट भीतीचें हास्य आणून तो पाही. जणूं काय तो सर्वांचा अंदाजच घेत होता. आरोपी आणि त्यांचे मित्र एकमेकांशीं हळू हळू बोलत होते. पण तें जमेना असें दिसल्यानें दोन मुली आरोपींच्या जवळ सरकल्या, हें कोणाच्या लक्षांतही आलें नाहीं.

न्यायाधीशाचें कागद चाळणें संपल्यावर कारकून ओरडला, " कोर्टांत शांतता ठेवा. " त्या लहानशा खोलीला न्यायालयाची गंभीरता आणण्याचा त्याचा प्रयत्न होता. आवाज बंद झाले. न्यायाधीशानें घसा साफ करून म्हटलें, " तुम्ही सर्व २० डिसेंबरला एका बेकायदेशीवर संस्थेचे सभासद होतां असा तुमच्यावर आरोप आहे, तो तुम्हांस मान्य आहे काय ? "

आरोपींचा म्होरक्या एक धीट आणि धटिंगण म्हणून प्रसिद्ध असलेला पदवीधर होता, तो म्हणाला, " हें कोर्ट आम्हीं मानीत नाहीं; तेव्हां त्याच्या कामकाजांत भाग घ्यायची आमची इच्छा नाहीं. तुम्हांला वाटेल त्याप्रमाणें करा ! "

" अस्सं ? अशी भूमिका तुम्ही घेणार ! " न्यायाधीश म्हणाला, " आपापल्या अभ्यासाला तत्पर राहायचें सोडून हे नसते उपद्व्याप तुम्हांला सांगितले कोणी ? तुमचा वेळ जायचा, आणि माझा; हें सर्व तापदायक आहे. काय, तुम्हीं उत्तर देणार नाहीं ? कुणीही तुमच्यापैकीं ? "

त्यांनीं सर्वांवरून एकदां नजर फिरविली. "अच्छा ! ऐका माझी शिक्षा. या बारा मुलांना नऊ महिने सक्तमजुरी आणि या दोन मुलींना एक महिना सक्तमजुरी किंवा दोनशें रु. दंड. तुम्ही स्त्रिया आपापल्या घरांत कां राहत नाहीं हें मला कळत नाहीं ! तुम्हांला जीवन कंटाळवाणं होतं म्हणून का तुरुंगांत जायला येतां...... "

" साहेब, " एक मुलगा म्हणाला, " या मुलींना तुम्हीं शिक्षा करूं शकत नाहीं. त्या आम्हांला भेटायला आल्या होत्या. त्या कांहीं आरोपी नव्हत्या. "

जरा दबकून न्यायाधीश थांबले आणि त्यांनीं समोरील कागदपत्रांकडे पाहिलें. मग त्या दोघी मुलींकडे पूर्ण कटाक्ष फेकून ते म्हणाले, " तुम्ही आरोपींच्या मध्यभागीं येऊन कां बसलां ? "

" म्हणजे त्याचं असं झालं ! " दोघींपैकीं धाकटी कान्ती नांवाची मुलगी सांगूं लागली, " इथं जागा अगदीं कमी होती. आणि आरोपींकरितां वेगळी अशी जागा नेमून दिल्याचं दिसलं नाहीं. आम्हीं कुठं बसायचं तें कुणी सांगेना. म्हणून आम्हीं इथं बसलों. यांत आमचा काय दोष ? तुम्ही वॉरंट दाखविल्याशिवाय आम्हांला पकडूं शकत नाहीं. "

" असं ! तुम्हांला मी पकडूं शकत नाहीं काय ? " रागानें लाल होऊन न्यायाधीश म्हणाला, " पाहूंच आतां. चपरासी ! दोन वॉरंटं घेऊन ये. " लागलींच वॉरंटें निघालीं. न्यायाधीशानें थरथरत्या हातानें त्यावर सही केली त्या मंडळीपुढें तीं धरून तो म्हणाला, " झालं ना तुमचं समाधान आतां ? तुम्हांला अटक करण्यांत आली असून शिक्षाहि दिली आहे ? "

" असं तुम्हांला करतां येणार नाहीं. " कांती थबकून जाऊन म्हणाली, " तुम्हांला कांहीं अधिकार, हक्क नाहीं आम्हांला पकडण्याचा. तुम्हांला वेड लागलं असलं पाहिजे. "

" अर्थात् वेडच लागलं आहे मला " तो ओरडला, " तुम्ही कॉंग्रेसवाले सध्यां असे वागत आहां कीं तुमच्या सान्निध्यांत येणारा कोण शहाणा राहूं शकेल ? तुम्हांला कशाची भीति वाटत नाहीं. तुम्ही कशानं अस्वस्थ होत नाहीं. घरीं राहण्याऐवजीं तुरुंगांत येऊन पडणं तुम्ही पसंत करतां. शांत, अभ्यासू जीवन न घालवितां तुम्ही पोरी रस्त्यांतून मिरवतां. लाठीहल्ले अन् अशींच दुसरीं संकटं विनाकारण ओढून घेतां. आणि आम्हां अधिकाऱ्यांची स्थिति पाहा काय झाली आहे ! सारा वेळ तुमच्या कटकटींत जातो. सकाळीं हे खटले चालवायचे. संध्याकाळीं क्लबांत जातां येत नाहीं; कारण एकादी मिरवणूक बहुधा निघालेली असायची, आणि कायदा आणि सुव्यवस्था राखण्याकरितां आम्हाला तिथं राहिल्याशिवाय गत्यंतर नसायचं. अरे

देवा! काय हा आयुष्यक्रम! पण पोरींनो! यामुळें तरी निदान तुम्ही राजकारणांत न पडण्याचा धडा शिकाल. एक महिन्याच्या तुरुंगवासानं तुमच्या डोक्यांतला मूर्खपणा सगळा निघून जाईल. अच्छा. नमस्ते."

अशा रीतीनें त्यांच्यावर तोंड टाकून न्यायाधीश निघून गेला. जो तो आश्चर्यचकित होऊन पाहतच राहिला. ही न्यायाची पद्धति अश्रुतपूर्व होती. आणि तरीहि तीवर कांहीं इलाज करणें तर शक्यच नव्हतें. कांति आणि मैत्रीण श्यामा यांनीं आपल्या आईबापांना हें सर्व कळविण्याविषयीं तुरुंगाच्या मुख्याला विचारलें. आईबाप बिचारे तिकडे झाल्याप्रकाराबद्दल पूर्ण अज्ञानांत होते. मुलींना तशी परवानगी मिळाली. त्याप्रमाणें चिठ्ठया लिहिल्या. त्यांनीं झाला प्रकार थोडक्यांत लिहून गाद्या व कांहीं कपडे त्यांनीं मागविले. हें इतकें झाल्यावर आपल्या मित्रमंडळींचा निरोप घेऊन मेट्रनबरोबर त्या तुरुंगांत गेल्या.

सारेंच कांहीं इतकें आश्चर्यकारक गतीनें घडून आलें होतें कीं तुरुंगावरील अधिकारीसुद्धां स्तिमित आले. ही गोष्ट न्यायदृष्टीनें बरोबर नव्हती; पण हें प्रकटपणें बोलण्याचा धीर त्यांना कसा होणार? न्यायाधीश हा दाढी-जटा नसलेला आधुनिक शीख असून त्याच्या रागाची प्रख्याति होती. देशभक्तांशीं त्याची वागणूक जनावरी पद्धतीची असे. आपण दुर्दैवानें हिंदी झालों याचें त्याला वैषम्य वाटे! इंग्रजी वेष व शिष्टाचार यांची नक्कल तो करीत असे हें खरें. पण कातडीचा रंग कसा बदलतां येणार? आणि हीच गोष्ट त्याला बोंचत असे.

या तुरुंगांत कमीअधिक मुदतीच्या स्त्रीकैदी कधींच न आल्यामुळें स्त्रियांचा असा वेगळा भाग राखून ठेवण्यांत आला नव्हता. कच्च्या कैदेंतल्या बंदिनीं-करितां एक आवार ठेवलें होतें. पण या बंदिनींना न्यायालयांत शिक्षा झाल्या कीं प्रांतांत जे अनेक तुरुंग स्त्रियांसाठीं राखून ठेवण्यांत आले होते, तिकडे त्यांना पाठविण्यांत येई. चार कोठडया, दहा बारा कैदी राहतील अशी एक मोठी बराक आणि सहासहा कैदी राहतील अशा दोन लहान बराकी असें या आवाराचें स्वरूप होतें. श्यामा व कांती यांना यांपैकीं एकांत ठेव-यांत येऊन कुलुप ठोकण्यांत आलें.

दोनही मुली त्या प्रांतांतील नाणावलेल्या घराण्यांतील होत्या. तुरुंगात त्यांना अकस्मात् अटक झाल्याची वार्ता शहरांत वणव्यासारखी पसरली. मेट्रन आणि इतर अधिकारी यांना पुढें काय होईल याची कल्पना नसल्यानें या दोन मुलींशीं तीं दोघें फार मार्दवानें वागत होतीं. दुपारीं तीनला त्यांना अटक करून आंत आणण्यांत आलें. पांच वाजतां मेट्रन त्यांच्याकरितां बिन-दुधाचा चहा व त्यांच्या घरून आणलेले कपडे घेऊन आली. तिनें सांगितलें कीं दोन माणसें तुम्हांला भेटायला आलीं आहेत आणि तुम्हांला भेटण्याची परवानगी त्यांना तुरुंगाच्या मुख्यानें दिली आहे. तीं माणसें कोण आहेत हें मेट्रनला माहित नव्हतें. त्यांच्या भेटीकरतां बरोबर ६ वाजतां दोघीजणींनीं हजर राहावें असें तिनें सांगितलें. हें तुरुंगाच्या नियमाविरुद्ध होतें. कारण दुपारीं ४ वाजल्यानंतर कुणाला कैद्यांची मुलाखत घेण्याची परवानगी नसे. श्यामा व कान्ती यांना विशेष सवलतीनें वागविण्यांत येत होतें हें यावरून उघड होतें.

टिनच्या भांड्यांतून घोटघोट चहा घेतां घेतां, कोण भेटायला आलें असेल यावर त्या मुली चर्चा करीत होत्या. आपणांला अटक अचानक व अनपेक्षित झालेली असली, तरी आईबाप कांहीं भेटायला खास येणार नाहींत याची त्यांना खात्री होती. कारण अटकेनंतर लगेच कांहीं तासांनीं मुलाखत मागणेंच मुळीं गैर झालें असतें. मग कोण आलें असावें ? त्या असा विचार करीत आहेत तोंच मेट्रन आली आणि त्यांना कचेरींत घेऊन गेली. तेथें दोन ओळखीचे तरुण पाहून त्यांना फार आश्चर्य वाटलें. हे दोघेजण येतील असें त्यांच्या ध्यानींमनीं नव्हतें. त्यांपैकीं एक श्यामाचा वकील मित्र होता. श्यामचा दंड भरून तिला सोडविण्यासाठीं तो आला होता. तिची सुटका केल्यानंतर न्यायाधीशानें तिला बेकायदेशीर रीतीनें पकडल्याबद्दल त्यावर तो फिर्याद करणार होता. दंड भरून सुटका करून घेण्याबद्दल श्यामाला त्यानें परोपरीनें विनविलें, पण ती ऐकेना. कॉंग्रेस स्त्रीपुरुषांनीं दंड भरण्याची प्रथा नव्हती. सरकार नेहमीं त्यांची जिंदगी किंवा जें कांहीं हाताला लागेल तें जप्त करण्याची सरकारची पद्धति होती. त्यामुळें त्या वकील मित्रानें श्यामला इतकें समजावून कांहीं उपयोग झाला नाहीं.

दुसऱ्या कोपऱ्यांत कांती आपल्या मित्राशीं बोलत बसली होती. तो नुकताच ऑक्स्फर्डहून परतला होता आणि नव भारताचें जागृत स्वरूप व स्वातंत्र्यासाठीं झगडण्याचा निर्धार पाहून तो चकित झाला होता.

तरुण आणि वृद्ध सर्व मंडळी निर्भय झालेली आणि लाठ्या व गोळ्या यांना न घाबरतां अहिंसात्मक पद्धतीनें यांना तोंड देणारीं हजारों माणसें पाहून त्याला विस्मय वाटला. कॉंग्रेसमधील पुष्कळ गोष्टी त्याला कळत नव्हत्या आणि कित्येकांशीं तो सहमत होत नव्हता, म्हणून त्यानें कॉंग्रेस-मध्यें नांव दाखल केलें नव्हतें. तरी दररोज तो कॉंग्रेसच्या अधिकाधिक जवळ येत होता हें निश्चित. एवढ्यांतच त्याला कांतीच्या अटकेची बातमी कळली आणि तो भडकून गेला. एका मोठ्या सरकारी अधिकाऱ्याशीं त्याचें नातें असल्यामुळें त्याला कांतीची मुलाखत मिळाली आणि श्यामाच्या मित्राप्रमाणें तो कांतीची समजूत घालत होता.

" पण कांती " आनंद आपल्या ऑक्स्फर्डच्या सफाईदार इंग्रजींत बोलूं लागला, "हें अमानुष आहे, अगदीं चूक आहे! हा न्यायाधीश अगदीं वेडा असला पाहिजे. हें बेकायदेशीरही आहे आणि तूं याची दाद लावून घेऊं शकशील. या गलिच्छ जागेंत मी तुला राहूं देणार नाहीं........."

" आनंद, मी तुझी आभारी आहें. पण या बाबतींत तूं कांहीं करूं शक-शील असं मला नाहीं वाटत ! " हें बोलत असतां कांतीच्या डोळ्यांत चमक दिसूं लागली. " आणि काय मौज आहे पाहा, आपल्या देशासाठीं तुरुंगांत जावं अशी माझी फार फार इच्छा होती. आणि ती माझ्या अपेक्षेपेक्षां लवकर पुरी होत आहे. तेव्हां माझ्या मित्रा! काळजी करूं नकोस; एक महिन्याचा तर प्रश्न आहे. मग तुला बाहेर पडल्यानंतर इथल्या जीवनाचीं खूप वर्णनं देईन. "

" ए, असं कांहीं भलतं बडबडूं नकोस; यांत कांहीं अर्थ नाहीं; मला वाटतं तुला कांहीं तरी अद्भुत प्रकरणाची नायिका व्हायचं आहे. आणि म्हणून हा एकच मार्ग तुला दिसला. तुम्ही आधुनिक पोरी आमच्या डोळ्यांत तिडीक उठवतां. सायंकाळच्या वेळीं साद घालूं तेव्हां घरीं सांपडेल अशी बाळबोध मुलगी मला आवडते. मैत्रिणीकडेच गेली आहे, एखाद्या सभेला

बाईसाहेब गेल्या आहेत, मिरवणुकीच्या अग्रभागीं आहेत, किंवा अशाच कसल्या तरी भानगडींत आहेत हें ऐकणं आपणाला नाहीं रुचत बुवा. तुम्हांला तुमचीं नीटनेटकीं घरं आवडत नाहींत म्हणून तुम्हाला जेलमध्यें यावंसं वाटतं."

"आनंद, आनंद" कांती खो खो हंसूं लागली.

"तुझं हें गमतीदार बोलणं ऐकलं कीं मला धक्का बसतो. आनंद, तूं जर असा वागलास, तर माझ्या मनांत विकल्प येतील."

"बस्स! म्हणजे पूर्वींच ज्या खुळचट कल्पना आहेत, त्यांत भर पडेल एवढंच." काहींसा अस्वस्थ व कांहींसा दोषी असल्यासारखा आनंदचा चेहरा दिसूं लागला. "हें पाहा कांती, आपला वेळ संपत आला आहे आणि मी तुझ्याशीं महत्त्वाच्या विषयाची चर्चा करायला आलों आहें. मी तुला इथं राहूं देणार नाहीं. मला सर्व नियम माहित आहेत. पण मी कांहीं कॉंग्रेसवाला नाहीं; तेव्हां हे नियम मला लागू नाहींत. मी तुझा दंड भरणार आणि तुला भयंकर वातावरणांतून काढणार. तुझा म्हातारा बाप आपल्या कंपाउंडमधून मला लाथ मारून काढून देईल हें मला ठाऊक आहे. तुम्हां पोरींचं मला मोठं आश्चर्य वाटतं. या मार्गाकडे वळतां कशा तुम्ही......?"

"हें पाहा आनंद, वेळ संपत आली; तुझ्या समजूतदारपणाविषयींचा मला आदर आहे. आणि तूं माझा दंड भरायला तयार झालास हें सुद्धां तुझ्या चांगुलपणाचं लक्षण आहे. पण मी तुला तो भरूं देणार नाहीं. मला कुणाला तोंड दाखवायला लाज वाटेल. माझा दंड भरायचाच असेल, तर माझे वडील भरतील, तूं नको. तूं असं कांहीं केलंस तर मी तुझं तोंड पाहाणार नाहीं, तुझ्याशीं बोलणार नाहीं. अर्थात् माझे धन्यवाद तुला आहेतच. तूं मला केव्हांही प्रियच आहेस."

"अरे देवा, या बाया कधींहि समजुतीनं घ्यायच्या नाहींत." नंतर निराश मुद्रा करून वकील-मित्राला चलण्याबद्दल त्यानें विचारलें. आणि दोघांनींही मुलींचा निरोप घेतला. मुली हंसत होत्या; पण या दोघांचीं तोंडें मात्र खिन्न होतीं. कांती आणि श्यामा ते फाटकाबाहेर जाईपर्यंत थांबल्या. नंतर त्यांनीं हात उचलून त्यांना शेवटचा निरोप दिला: आणि

मग त्या आंत आल्या. मनांत विषण्ण आणि खिन्न होऊन आनंद स्वतःशींच म्हणाला, "शूर असल्या, तरी काय विचित्र पोरी आहेत! धिक्कार असो त्यांना." तो मोटरींत चढून निघून गेला.

रात्र फार गारठ्याची होती आणि बाहेर काळोख मी म्हणत होता. बराकींत व कोठडींत असलेल्या मिणमिणत्या प्रकाशाखेरीज एकहि वस्तु दिसत नव्हती. कैदी मधूनच कांहीं बडबडत तेवढी शांतता भंग पावे. पुनः शांत होई.

शेवटच्या बराकींत आवाराच्या अगदीं कोंपऱ्यांत आपणांस घालून दिलेल्या खाटांवर पडून श्यामा व कांती हलक्या आवाजांत बोलत होत्या. दिवा विझला होता आणि अगदीं थोड्या इंचांवरचेंहि दिसत नव्हतें. दोन ब्लँकिटें अंगावर घेऊनहि, आंत येणाऱ्या गार वाऱ्यानें त्या गारठल्या होत्या. दिवसांतले खळबळीचे कार्यक्रम संपले होते आणि त्यांना आतां कांहीं बरें वाटत नव्हतें. आपलें कॉलेज महिनाभर बुडणार म्हणून श्यामा हळहळत होती, तर कान्तीला आपल्या वृद्ध मातापित्यांची चिंता लागून राहिली होती. आपले रुग्ण वडील कसे जागत बसतील, आपल्या आठवणीनें मनांत विव्हल होऊन आणि सारें लक्ष तुरुंगाकडे लावून वरकरणीं कामांत दंग असल्यासारखें कसे दाखवितील, हें तिला स्पष्ट दिसत होतें. 'मी आजारी आहें आणि घरीं माझ्याजवळ कुणी असणं जरूर आहे. म्हणून तूं तुरुंगांत जाऊं नको' असें वडील सांगत होते आणि तें आपण ऐकलें नाहीं म्हणून ते रागावले असतील असेंही कांतीला वाटलें होतें. पण अर्थात् यांत आपला कांहीं दोष नाहीं आणि या विचित्र परिस्थितींत आपण कांहीं मुद्दाम होऊन सांपडलों नाहीं हें वडिलांना समजूं शकेल हेंहि ती जाणून होती. आपल्या मुलीला तुरुंगाच्या कोठडींत साध्या थंडगार भुईवर झोंपावें लागेल या कल्पनेनें आपल्या आईला सुखशय्येवर झोंपहि येत नसेल हें तिला कळत होतें.

कांन्तीला घरची आठवण असह्य होऊन ती दुःखी झाली. निदान आपल्या माता-पित्यांचा निरोप तरी घेतां आला असता तर बरें झालें असतें असें तिला वाटलें. पण तें शक्य झालें नाहीं! शरीर—मनाच्या थकव्यानें भुकेचा कल्लोळ पोटांत उठला असतांहि तिला डुलकी येत होती. त्यांना जेवण देण्यांत आलें नव्हतें! ती अर्धवट झोंपेंत असेल, तोंच तिच्या

अंथरुणावर धपकन कांहीं तरी पडलें. धडधडत्या छातीनें ती उठून बसली. "श्यामा-श्यामा, माझ्या बिछान्यावर कांहीं पडलं. काय असेल पाहा, पहा !"

" मला कसं कळणार, कान्ती ? अग माझा अंमळ डोळा लागत होता, तों कशाला उठवलंस मला ? "

" माफ कर " कान्ती म्हणाली आणि कांहीं पडलें असल्यास तें फेकलें जावें म्हणून तिनें ब्लँकेट् झटकून टाकलें. पुनः सामसूम झाली. पण शान्तीला झोंप येईना. रात्र सरतां सरेना. इतक्यांत तिला श्यमानें हलकेच उच्चारलेले शब्द ऐकूं आले, " कान्ती, कान्ती, माझ्या अंथरुणावर कांहीं तरी सरपटत येत आहे. काय करूं मी ? " भयभीत होऊन श्यामा विचारीत होती.

" अग, मीं झटकलं तसं झटकून टाक. " आतां श्यामाच्या बिछान्यावर कांहीं आलें होतें, यामुळें कान्ती बरीच धीट होऊन सांगूं लागली.

" छे...शक्य नाहीं ग. कांहीं तरी मोठं प्रकरण आहे. घाबरून गेलें आहें मी. " श्यामा स्फुंदत म्हणाली.

" अहा रे भित्री भागूबाई ! " कान्ती म्हणाली, " मी झटकतें. " तिनें ब्लँकेट धरण्याकरितां हात पुढें केला, पण अंधारांत कांहीं दिसेना. इतक्यांत एक किंचाळी उमटली !

" कान्ती, काय झालं ? " श्यामा ओरडली.

" अशी किंचाळूं नको. काय झालं सांग. "

" मला समजत नाहीं. " कान्ती स्फुंदत म्हणाली, " पण कांहीं गार आणि सडसडीत हाताला लागलं माझ्या. भयंकर आहे ! आज रात्रभर मी जागत बसणार. आज रात्रीं आपल्यावर आणखी काय काय अरिष्टं कोसळणार आहेत देव जाणे ! "

" ऐक " श्यामा म्हणाली, " मला भास होतो आहे कीं काय कळत नाहीं; पण तुला आवाज ऐकूं येतात का पाहा. "

कान्तीनें कान देऊन ऐकलें, तेव्हां तिला अस्पष्ट बोलणीं ऐकूं येऊं लागलीं. तीं अधिक अधिक जवळ येत होतीं. एका माणसाच्या हातांत कंदील दिसत होता आणि त्या अंधारांत व गारठ्यांत त्यामुळें किंचित् ऊब आल्यासारखें वाटत होतें. अंधाऱ्या रात्रीच्या त्या स्मशानशांततेंत दाराचीं कड्या-कुलुपें

उघडतांना होणारा आवाज केवढा वाटला! पण त्या दोघां मुलींना तो स्वागताईच वाटत होता. अशा मध्यरात्रीं कोण भेट द्यायला आलें ? याचा त्या विचार करूं लागल्या.

मेट्रन पहारेकरीण आणि तुरुंगाचा अधिकारी यांना घेऊन आली होती. कोठडीजवळ आल्यावर तो अधिकारी म्हणाला, " तुमचं सामान आवरून तयार व्हा बरं. तुमची सुटका झाली आहे, तुम्हांला आतांच्या आतां निघालं पाहिजे. "

तो काय म्हणतो हें प्रथम ध्यानांतच न आल्यामुळें त्या मुली थंड चेहऱ्यानें उभ्या राहिल्या. " कृपा करून तयारी करा. " मेट्रननें पुनः सांगितलें, " तुम्हांला घरीं घेऊन जायला बाहेर कुणी तरी आलं आहे. "

" पण हें कसं शक्य आहे. " श्यामानें विचारलें. कान्तीला कांहीं उमगच पडत नव्हता. " इतक्या रात्रीं कुणाला सोडत नाहींत. आणि कोण आलं आहे हें आम्हांला कसं कळावं ? आतां मी नाहीं जाणार. कान्ती, अशा या वेळीं ते आपणांला कुठं नेतील कुणाला ठाऊक! आपण इथंच राहणं बरं. "

" तुमच्या सुटकेचा हुकुम झाल्यावर आम्ही तुम्हांला इथं ठेवूं शकत नाहीं. म्हणून जलदी करा आणि तयार व्हा. मध्यरात्र झाली आहे, थंडी मीं म्हणत आहे. तुमच्याशीं हुज्जत घालीत उभं राहणं आम्हांला शक्य नाहीं. "

" ठीक आहे. " कान्ती म्हणाली, " चल श्यामा, जलदी कर. हे सर्व जेल आपल्यावर त्रिसंबण्यापूर्वीं आणि या माणसांचीं मनं बदललीं नाहींत तोंवर या भयंकर जागेतून आपण आपली सुटका करून घेऊं या. "

अगदीं थोड्या अवधींत त्यांनीं आपल्या वळकट्या बांधल्या आणि मेट्रनबरोबर त्या कचेरींत आल्या. तेथें कुणीच नव्हतें, पण बाहेरच्या बाजूस पोलिसांची गाडी उभी होती. पुनः त्या मुली बुचकळ्यांत पडल्या. आपणांला घरींच नेणार कीं एकाद्या अज्ञात स्थळीं नेणार यांतलें निश्चित त्यांना कांहींच कळेना. पण गाडीच्या मागल्या बाजूनें तो तरुण वकील मित्र आपल्याकडे येतांना त्यांनीं पाहिला तेव्हां त्यांना जरा धीर आला. वरिष्ठ न्यायाधीश शिक्षा

करणाऱ्या न्यायाधीशावर या मुलींना अशा तऱ्हेनें वागविल्याबद्दल फार संतापला आहे असें त्या मित्रानें सांगितलें. वरिष्ठ न्यायाधीशानें रात्रीं ८ वाजतांच या मुलींना सोडण्याचा हुकुम दिला होता. पण एकंदर उपचाराचें सव्यापसव्य होण्यांत चार तासांचा अवधि गेला, म्हणून अशा आडवेळीं यांना यावें लागलें.

मेट्रनलाही हायसें वाटलें. तिचा निरोप घेऊन मुली गाडींत बसल्या आणि आपापल्या घरीं गेल्या.

दुसरे दिवशीं सकाळीं जेव्हां मुलींच्या गाद्या उलगडण्यांत आल्या ( रात्रीं त्या गाद्यांना त्यांनीं कुणी हात लावूं दिला नाहीं! ) तेव्हां त्यांतून माशा, कोळी, सरडे आणि असे विचित्र प्राणी बाहेर पडले! मुलींच्या अंगावर शहारे आले आणि तुरुंगाचें प्रकरण थोडक्यांत संपलें म्हणून त्यांनीं देवाचे आभार मानले.

तिचें वय फक्त बारा वर्षांचें होतें आणि तिच्या वडिलांना जगांत तें पृथ्वीमोलाचें रत्न वाटे.' लहानपणापासून तिची आपल्या बापावर फार भक्ति होती. दररोज जेव्हां संध्याकाळीं तो परत येई तेव्हां ती त्याची वाट पहात दाराशीं थांबलेली असे. त्यानें हास्यमुखानें तिला उचलून घ्यावें आणि गाढ मिठी मारावी याचा तिला किती आनंद होई ! कित्येकदां त्याची वाट पाहत असतां ती डोळे मिटून घेई, आणि त्याचीं पावलें वाजूं लागलीं कीं तिचें बाल-हृदय आनंदानें नाचूं लागे. त्याच्या आवाजांत तिला जादू वाटे. आणि त्या हास्यानें मनांतलीं वादळें नष्ट होऊन तेथें महोत्सवाचा आनंद निर्माण होई. त्या बालजीवनांतील दुःखांतून विनोदाच्या छटा झळकूं लागत.

रामकलीची आई ती दोन वर्षांची असतांनाच वारली. तेव्हांपासून तिच्या मोठ्या आत्यानें तिचें पालन केलें. तीं तिघेंजण बरेच वर्षें आनंदांत राहिलीं. रामकलीच्या वडिलांनीं दुसरें लग्न केलें नाहीं. त्यांच्या जातीच्या रिवाजाप्रमाणें हें जरा नवलाचेंच होतें.

दिवाळीची रात्र होती. झकपक कपडे घालून रामकली बापाची वाट पाहत दारांत उभी होती. दूर मुलें गोंगाट करीत होतीं आणि फटाकडे उडवीत होतीं. अंधार विशेष पडला नव्हता तरी लोक दिव्यांची आरास करूं लागले होते. 'मी लवकर येईन आणि तुला दिवे लावायला मदत करीन,' असें बापानें, रामकलीला सांगितलें होतें. पण अंधार अधिक अधिक पडूं लागला तरी बाप परत येण्याचें लक्षण दिसेना. अधीर होऊन रामकली वाट पाहूं लागली; पण तिची निराशाच होत होती. तिला जेव्हांपासून आठवत होतें तेव्हांपासून नेहमीं दिवाळींत तिनें आणि बापानें मिळूनच दिव्यांची आरास केली होती. परत येण्याचा तिच्याशीं केलेला वायदा त्यानें कधीं चुकविला नव्हता. मग आजच त्याला असा विसर कां बरें पडावा ?

एकटी बसून गेल्या कांहीं महिन्यांतील हकीकतींचा ती विचार करीत होती. जीवनक्रम सर्व वेळीं कांहीं सारखा नसतो.पण त्यांत होणाऱ्या बदलाची तिला कल्पना नव्हती. कांहीं तरी वेगवेगळे होत आहे एवढें तिला वाटे, पण तें काय आहे हें तिला कळत नसें. आपला मृदु प्रकृति, सौजन्यशील, सदा सर्वांशीं जुळवून घेणारा बाप अलीकडे प्रत्येकाशीं तुसडेपणानें कां वागतो हें तिला दिसत होतें. यांतून आत्याहि सुटली नव्हती. अलीकडे बहिणीचे आणि त्यांचे वाद होत आणि रामकली आली कीं लगेच बोलणीं बंद होत.रामकलीनें त्यांकडे विशेष लक्ष दिलें नव्हतें; पण आज मात्र तिला नाना प्रकारच्या संशयांनीं घेरलें आणि तिला फार भीति वाटूं लागली.

रात्र बरीच झाली होती. आणि तरी रामकलीच्या घरांत दिवेलागण झाली नव्हती. भोंवतीं सर्व दारें उजळलेलीं होतीं आणि अंधारांत सुंदर दीपपंक्ति तेवत होत्या. प्रकाश नव्हता असें घर रामकलीचेंच होतें आणि त्यामुळें तें कसल्या तरी दुर्दैवी घटनेच्या फेऱ्यांत सांपडल्यासारखें दिसत होतें. निराश व कष्टी होऊन रामकलीनें निःश्वास सोडला आणि ती घरांत परत आली. आत्याला तिनें सांगितलें कीं आतां वडिलांची वाट पाहण्यांत अर्थ नाहीं; आपणच दिवे लावले पाहिजेत. आत्या आपल्याकडे दुःखपूर्ण दृष्टीनें पाहत आहे व कांहीं बोलावयचें आहे तें बोलूं शकत नाहीं हें रामकलीच्या लक्षांत आलें नाहीं. तसेंच संमतिदर्शक मान हालवतांना आत्यानें ओठ किती दाबून धरलें हेंहि तिनें पाहिलें नाहीं.

" फुआजी, बाबांना यायला कां उशीर झाला असेल असं तुम्हांला वाटतं ?" सर्व दिवे लावून झाल्यावर रामकलीनें विचारलें.

" बाळ, उशीर लागेल असं ते कांहीं म्हणाले नाहींत, म्हणून मी तुला बोललें नाहीं. मला वाटलं नाहीं त्यांना उशीर लागेल असं. "

"पण मी बाहेर वाट पाहत उभी होते तेव्हां तूं कां नाहीं बोललीस? त्यांनीं तरी कां नये सांगूं ग ? कांहीं तरी झालं आहे अन् तें तूं तुला ठाऊक असून तूं मला सांगत नाहींस. सांग ना." इतक्यांत पाउलें वाजूं लागलीं आणि वडील आले म्हणून सहर्ष मुद्रेनें रामकली बापाला भेटायला गेली. पण दारांतच तिला दिसलें कीं बाप एकटा नसून अनेक माणसें त्याच्याबरोबर

आहेत. ती स्तंभितच झाली. दिवे लावायला इतकीं माणसें पूर्वी कधीं आलीं नव्हतीं, म्हणून या आगंतुकांच्या मेळाव्याचा तिला राग आला. बापाबरोबर बरेच पुरुष आणि एक स्त्री होती. ही स्त्री रामकलीच्या वडिलांकडे पाहत निर्लज्जपणें हंसत चालली होती. आपल्या ओळखीची कुठलीहि स्त्री असें वागली नसती हें अंतःप्रेरणेनें रामकलीला कळलें आणि प्रथमदर्शनींच त्या बाईबद्दल तिला तिटकारा वाटूं लागला. ही सर्व मंडळी दारापाशीं आल्यावर रामकलीचा बाप सावकाशपणें तिच्याजवळ आला आणि खुलास स्वरांत बोलूं लागला "रामकली, बघ तुला दिवाळीची भेट काय आणली आहे ! लहान मुलींना जी गोष्ट हवी असते, आणि तुला नव्हती अशी आहे" आणि त्या बाईला हातानें धरून रामकलीला तो म्हणाला, "बाळ, ही तुझी नवी आई; आतां आज्ञाधारक मुलीप्रमाणं खालीं वांकून तिच्या पायाला स्पर्श कर बरं."

रामकलीचा विश्वासच बसेना. बाप काय म्हणतो हें तिला मुळीं कळेनाच ! ही त्याची सर्व चेष्टा तर नसेल ? पुतळ्यासारख्या शून्यदृष्टीनें पाहत ती उभी होती आणि तिचें मन गोंधळांत सांपडलें होतें.

"ठीक" ती बाई म्हणाली, "रामकली, तुझा निर्णय होईपर्यंत मी रात्रभर उभी राहूं काय ? मी तुझी नवी आई, माझ्या आज्ञा तुला पाळल्या पाहिजेत. हं. कर सुरुवात. तुझ्या वडिलांनीं सांगितलं तसं कर पाहूं." तरीहि रामकली स्तब्धच होती. तिच्या त्या वागण्यांत औधत्य आहे असें वाटून बाप करड्या आवाजांत म्हणाला, "हं, चल आटप. करतेस कीं नाहीं नमस्कार ?"

तिथून निसटावें अशी रामकलीची इच्छा होती. ती भोंवतीं पाहूं लागली. पण बापाला तिच्या स्वभावाची कल्पना असल्यानें तिचा हेतु त्याच्या ध्यानांत आला. नेहमीं हंसतमुख असणारा त्याचा चेहरा दारूनें धुंद व क्रूर झाला होता ( पूर्वी कधीहि तो दारू घेत नसे ! ) रामकलीच्या दंडाला धरून तो कठोरपणें म्हणाला, "पोरी, तुझा ताठरपणा चालणार नाहीं. सांगितलं तसं मुकाट्यानं कर, नाहीं तर मार मिळेल."

बापानें पूर्वी तिला कधींहि असें वागविलें नव्हतें; त्यामुळें रामकलीचे डोळे अश्रूंनीं भरून आले. त्याला हिसका देऊन त्याच्या हातांतून सुटण्याचा रामकलीनें प्रयत्न केला, पण बापाच्या पोलादी पकडींतून तिला निसटतां

येईना. दारूची नशा चढल्यामुळें आपण काय करतों आहोंत हें त्याला कळत नव्हतें. तिच्या सुंदर, लांब केसांना धरुन त्यानें तिला आंत ओढीत आणि धोपटत नेलें. पूर्वी त्यानें कधीं तिला हात लावला नव्हता.

" तुझी आत्या तुझ्या कानांत विष ओतीत होती, म्हणून माझी अमर्यादा करण्याचा तुला धीर आला, दुसरं काय ? तिनं तुला सारं सांगितलेलं दिसतं. तुझी नवी आई एक नर्तकी आहे आणि आपल्या जातींत मिसळायला ती योग्य नाहीं. होय ना ? नाचणारी पोरगी असली म्हणून काय झालं ? लोकांनीं त्यांत वाईट काय म्हणून मानावं ? आतां मीं तिच्याशीं लग्न केलं आहे. ती माझी बायको आहे, तुझी आई आहे, समजलीस ? मी तुझे किंवा कुणाचे हे चाळे सहन करणार नाहीं. गुढघे टेकून उद्धट वर्तनाबद्दल तिची क्षमा माग. "

रामकली स्फुंदत होती. बापानें सक्तीनें तिला खालीं वांकून आपल्या म्हणण्याप्रमाणें करण्यास लाविलें. एवढें झाल्यावर त्याची मगरमिठी सुटली. मग रामकलीच्या दैन्यावस्थेकडे दुर्लक्ष करून सर्व मंडळी तेथें बसली आणि हास्यविनोद करूं लागली. किंचित् काळ रामकली तेथें थांबली आणि नंतर धांवतच आंत आत्याकडे गेली. कांहीं न बोलतां आत्यानें तिला मिठी मारली. आत्यानें सर्व प्रकार ऐकला होता. विचारायचें असें कांहीं नव्हतेंच. एकमेकींना त्या बिलगून बसल्या आणि दोघींचेंहि ज्यावर उत्कट प्रेम होतें त्याच्यासाठीं दोघींच्या डोळ्यांतून वाहणाऱ्या गंगायमुना एकत्र आल्या.

हशा, गप्पाष्टकें, आणि मद्यपान यांचा आवाज मध्यरात्रींपर्यंत त्या खोलींतून येत होता. जेवणाला स्पर्श न करतां रामकली आणि तिची आत्या निजून राहिल्या. दुःखवेदनांनीं थकून गेल्यामुळें रामकलीचा डोळा लागला, पण तिची आत्या जागी होती. पलीकडे उठलेला हास्याचा प्रत्येक कल्लोळ तिच्या हृदयांत सुरीसारखा जाई. ती म्हणत होती, " या बयानं माझ्या भावावर काय जादूटोणा केला कुणाला ठाऊक ? याच्यापूर्वी दारूला स्पर्श केला नव्हता त्यानं किंवा कधीं वाईट संगत धरली नव्हती त्यानं. झालं कसं हें ? "

दुसऱ्या दिवशीं सकाळीं, रामकलीकडे न पाहतां तिचा बाप आपल्या बहिणीला म्हणाला, " ताई, काल रात्रीं फार उशीर झाला म्हणून मी माझ्या

पत्नीला तुझ्या पायां पडण्यासाठीं अन् तुझा आशीर्वाद घेण्यासाठीं आणलं नाहीं. आतां तूं रिकामी असशील, तर तिला बोलावितों."

"मला वाटतं यावर आपण खूप बोललों आहोंत." ती सौम्यपणें म्हणाली, "आतां त्याची गरजही नाहीं; मी घर सोडून चाललेंच आहें. या बाईला तुझी पत्नी म्हणून मी मान्यता देणार नाहीं आणि तिच्याशीं संबंधहि ठेवणार नाहीं. आतां नवीन सुधारकी चाळे शिकण्याचं माझं वय नाहीं. आपल्या पूर्वीच्या चालीरीति मी विसरूं शकत नाहीं. तुझ्या या वेश्या पत्नीला मी भेटणार नाहीं. आणि रामकलीनंहि तिच्याबरोबर राहणं योग्य नाहीं. तूं परवानगी देत असशील, तर रामकलीला मी बरोबर नेतें. बरं वाटेल मला. अशी माझी इच्छा नाहीं......"

"ताई!" मध्येंच तो म्हणाला, "तूं माझी मोठी बहीण नसतीस तर मी असं कांहीं तरी तुला बोललों असतों! किंवा केलं असतं कीं ज्याचा पुढें मला पश्चात्ताप झाला असता. तूं हें कसं म्हणूं शकतेस? किशोरी इतर वेश्यांसारखी नाहीं हे तुला मीं सांगितलं होतं नाहीं का? ती वेश्या होती खरं, परंतु इतर कित्येक स्त्रियांप्रमाणं नाइलाजानं तिला त्या धंद्यांत पडावं लागलं. नृत्यकलेची तिला फार आवड असूनहि तिनं नाच सोडून द्यायचं कबूल केलं आहे. ताई, समजुतीनं घे. तूं गेलीस तर माझं नुकसान आहे. आम्ही सर्व उपाशीं मरूं. किशोरीला स्वैंपाक करतां येत नाहीं. तूं कशी सुग्रण आहेस हें मीं तिला सांगितलं आहे. आणि..."

"लाज वाटते का तुला, दादा? अरेरे! हा दिवस पाहायला अणि तुझं हें बोलणं ऐकायला मी जिवंत राहिलें. काय पापं मीं पूर्वी केली कुणाला ठाउक! या बाईला स्वैंपाक येत नाहीं म्हणून मी राहावं हें सांगायला तुला लाज कशी वाटत नाहीं? तुझ्या सध्याच्या वेडेपणाबद्दल परमेश्वर तुला क्षमा करो! पण मी यांत भाग घेऊं शकत नाहीं. मी इथं पाणी प्यायला सुद्धां थांबणार नाहीं."

"जायचं असलं तर मग जा. पण रामकली कांहीं तुझ्याबरोबर येणार नाहीं." तो रागानें म्हणाला. नंतर रामकलीकडे वळून त्यानें तिला बजावलें कीं तूं जर पळून जाण्याचा प्रयत्न केलास, तर तुला कड्याकुलुपांत

बंदोबस्तांत ठेवीन. इतकें सांगून तो तेथून निघून गेला. जिनें त्याला जन्मभर वाढविलें, त्या बहिणीचा निरोप घेण्यासहि तो थांबला नाहीं.

रामकलीला रडूं कोसळलें. आत्याला तिनें जाऊं नको म्हणून सांगितलें आणि जात असशील तर मला घेऊन जा असें विनविलें. पण आत्यानें सौम्यपणें व निश्चयपूर्वक तसें करण्याचें नाकारलें. तिनें सामानाची बांधाबांध केली. रडणाऱ्या रामकलीला मिठी मारली. आणि नंतर तें घर सोडून ती निघून गेली.

यापुढें रामकलीचें जीवन म्हणजे एक भेसूर स्वप्नच होतें. स्वैंपाकासकट सर्व घरकाम किशोरी तिच्याकडून करून घेई. कारण, किशोरीला कशाचीच दगदग नको होती.

सर्व दिवसभर नवरा कामाला गेला असतां किशोरी आपल्या पुरुष-मित्रां-समवेत काळ काढी आणि त्यांना सरबतें व मिठाई देण्यांत रामकलीचा जीव नकोसा होई. हे लोक रामकलीच्या यौबनाला आणि सौंदर्याला उद्देशून गलिच्छ उद्गार काढीत. कसलीही कुरकुर न करतां रामकली आपलें काम करीत असे. एके काळची ती उत्साही आणि प्रसन्न छोकरी आतां खिन्न व निराश होऊन गेली. तिचें उसळणारें हास्य व चेष्टा-विनोद बंद पडले आणि राग आणि तिरस्कार यांनीं तिचें अंतःकरण व्याप्त झालें.

सावत्र आईच्या राज्यांत कांहीं महिने घालविल्यावर रामकली अगदीं निस्तेज दिसूं लागली. एके दिवशीं किशोरीनें तिला बोलावलें आणि मोठ्या प्रेमानें तिच्याशीं संभाषण सुरू केलें. नेहमी ती रामकलीला या ना त्या गोष्टीवरून टोमणे देई. पण आज ती फारच प्रेमळपणें वागत होती. त्यामुळें रामकलीला अस्थिरता आणि भय वाटूं लागलें.

"हें पाहा बाळ!" किशोरी म्हणाली, "तूं आतां चांगली पणांत आली आहेस. तूं सडपातळ असलीस तरी रूपानं कांहीं वाइट नाहींस. माझ्या एका मित्राला तूं आवडली आहेस आणि त्याला तुझ्याशीं लग्न करण्याची इच्छा आहे. अर्थात् तो तुझ्यापेक्षां वयानें बराच मोठा आहे. पण कांहीं बिघडलं नाहीं. तो खूप श्रीमंत आहे. आणि लग्न करण्याची त्याची आतांपर्यंत इच्छा नव्हती. तो रखेल्या ठेवीत असे. म्हणजे पाहा तुझ्याशीं लग्न करण्यांत

तो तुला केवढा मान देत आहे ! जा, एक सुंदर साडी नेस. तो तुला पाहायला येणार आहे. आणि पोरी, चेहरा हंसरा ठेव अं. मला उदास पोरी आवडत नाहींत." ती जरा धमकावणीच्या स्वरांतच म्हणाली.

एक शब्दहि न बोलतां रामकली त्या खोलींतून निघून गेली. कपडे बदलून ती परत आली त्या वेळीं किशोरी आणि एक गृहस्थ एकमेकांस खेटून बोलत बसली होतीं. रामकलीला पाहतांच तीं दोघें दूर झालीं. तो मनुष्य लठ्ठ आणि कुरूप व व्यसनानें पोखरलेला असा दिसत होता. रामकली त्याला पाहतांच सर्द झाली. तो उठला आणि रामकलीच्या पुढें उभा राहून त्यानें तिला आपाद मस्तक न्याहाळलें. नंतर "किशोरी, ही कांहीं वाईट नाहीं. खरं म्हणजे मी हिच्या चेहऱ्यावर खूष झालों आहें. हिचे तुला किती पैसे पाहिजेत ?" हिच्यासमोर असें कांहीं बोलूं नका अशी किशोरीनें त्याला खूण केली. पण तिकडे लक्ष न देतां रामकलीला स्पर्श करण्यास तो पुढें सरकला. हा काय करतो आहे हें न कळतांच रामकली एकदम मागें सरकली आणि यामुळें तो रागावला.

"पोरी, तुला मी आवडत नाहीं असं मला दिसतं." तो बरळूं लागला, "पण आतां हें तुला शिकलं पाहिजे. तुला पुष्कळ गोष्टी मला शिकवाव्या लागतील. आणि आज्ञाधारकपणा ही त्यांतली पहिली." तिला जवळ ओढून आणि तशीच धरून तिच्या डोक्यावरून हात फिरवीत तो म्हणाला. सभय होऊन जवळ उभ्या असलेल्या रामकलीच्या प्रत्येक अवयवांत कंप सुटला होता. "बरं," त्या माणसानें विचारलें. "किशोरी, तुला किती पाहिजेत पैसे हिच्याबद्दल ? हिचा बाप यायच्यापूर्वीच हिला मीं घेऊन जाणार. न जाणों, त्याला आपला बेत पसंत पडायचा नाहीं. मीं तुला पन्नास रुपये देईन."

"फार उदार आहांत तुम्ही !" किशोरी उपरोधिकपणें म्हणाली, "तुम्ही या पोरीवर पैसा कमाविणार आणि मला मात्र पन्नास रुपड्या देणार काय ? तुम्ही माझे मित्र म्हणून फक्त तीनशें रुपये घेईन मी. त्यापेक्षां दिडकी कमी घेणार नाहीं. तिऱ्हाइताला तर मी पांचशें सांगितले असते. पत्करलं तर पाहा. जलदी करा. फुकट घालवायला वेळ नाहीं आपल्याजवळ."

" ठीक आहे, किशोरी." तो म्हणाला. रामकलीच्या भेदरलेल्या चेहऱ्यावर त्याची साभिलाष दृष्टि खिळली होती. " रागावूं नको. तूं म्हणतेस तेवढे पैसे देईन मी. तुझ्यासारख्यांचीच नेहमीं गांठ पडल्यामुळं या पोरीच्या पावित्र्याचा मला मोह पडतो. नवीन आहे हा अनुभव. मी तिला जाऊं देणार नाहीं आणि इतरांनाहि तिचा उपभोग घेऊं देणार नाहीं." तो बडबडूं लागला, " मी एकटाच या सौंदर्याचा आणि पावित्र्याचा मालक राहणार. मलाच कंटाळा आला तर मग पुढं पाहतां येईल."

हें सर्व ऐकून सर्व बोध नीट न होतांहि त्या माणसापासून पळून जावेंसें रामकलीला वाटत होतें. सर्व अर्थ डोक्यांत उतरल्यावर तर ती रागानें वेडीच झाली. त्या माणसाच्या तावडींतून आपली सुटका करून निघून ती बाहेर पळाली. त्या विस्मयचकित जोडप्याला तिला आवरतांहि आलें नाहीं. तो मनुष्य शिव्या देऊं लागला. किशोरीनें पाहिलें कीं, वेळ घालविण्यांत अर्थ नाहीं. त्याला आपल्या मागोमाग येण्याला सांगून रामकली मागोमाग पळाली. पण रामकली दृष्टीआड झाली होती. तिनें प्रसंगावधान ठेवून धूम ठोकली होती. कांहीं वेळानें तिनें मागें बघितलें आणि आपला कोणी पाठलाग करीत नाहीं असें पाहून थोडा दम खाऊन विसावा घ्यायचें तिनें ठरविलें. एका झाडाच्या बुंध्याला टेकून ती बसली. पांच मिनिटें गेलीं नसतील तों तिला आरडाओरडा ऐकूं आला. तिनें वळून पाहिलें तों किशोरी आणि तिचा तो मित्र धांवत त्या बाजूस येत होता. आणखी कांहीं माणसें त्यांच्या मागोमाग वाट चालत होतीं. रामकलीनें पुनः पळायला सुरुवात केली. सर्व जण ओरडत आणि शिव्या देत तिच्या मागें लागले. दैवच तिला प्रतिकूल होतें. भयभीत होऊन आणि किंचित् गोंधळून ती एका झाडाच्या बुंध्याला धडकली आणि तोंड सरपट होऊन खालीं पडली. क्षणभर तिला कांहीं सुचलें नाहीं. पण नंतर कोणतें संकट पाठलाग करीत आहे हें तिनें जाणलें. ती उठण्याचा प्रयत्न करूं लागली. पण ती उठणार, इतक्यांत किशोरी तिथें येऊन पोंचली आणि तिनें तिला धरलें. भीति-द्वेषामुळें अंगीं आलेल्या नव्या बळानें किशोरीची पकड सोडवून रामकली रानटी मांजराप्रमाणें तिच्याशीं झगडूं लागली. किशोरीनें

तिचे केस धरले. इतक्यांत मागली माणसें तेथें येऊन थडकलीं. त्या दोघींना सोडविण्याचा प्रयत्न न करतां तीं सर्वच त्यांच्या झगड्याची गंमत पाहत बसलीं. रामकलीचा हटवादीपणा पाहून किशोरी भयंकर चिडली आणि तिनें रामकलीच्या हातावर एक तडाखा दिला. तिची मिठी यामुळें ढिली पडेल असें तिला वाटत होतें. पण वेदना आणि राग यांनीं अंध बनून रामकली स्वैरपणें किशोरीला धरून एकामागून एक तडाखे लगावूं लागली. त्या मुलीच्या रागाला तोंड देणें किशोरीला अशक्य झालें आणि मागें सरकत ती एका जुनाट विहिरीच्या कांठाशीं आली. त्या दोघींनाहि त्या विहिरीचें अस्तित्व जाणवलें नव्हतें. रामकलीनें एक प्रचंड तडाखा दिला. आणि काय झालें याची कुणाला कल्पनाहि न येतां किशोरी आरडत विव्हळत विहिरींत पडली. सर्व स्तब्ध झालें ! प्रथम कुणी कांहींच बोललें नाहीं. नंतर त्यांपैकीं एकजण ओरडला, आणि त्यानें इतरांना रामकलीला धरण्यास सांगितलें. तो स्वतः किशोरीला बाहेर काढण्याकरितां त्या कोरड्या विहिरींत उतरला. रामकली आपल्या जागींच उभी होती. काय झालें हें तिला कळेना. इतरांनीं तिला पकडलें. तेव्हां पळून जाण्याचा तिनें कांहीं प्रयत्न केला नाहीं. कांहीं वेळानें किशोरीला वर काढण्यांत आलें. डोक्याची कवटी फुटून ती मृत्यु पावली होती......

× × ×

जिल्हाधिकाऱ्याची पत्नी तुरुंगाला भेट देण्याकरितां आली होती. तिची खुशामत करण्याची तेथील अधिकाऱ्यांत जणूं चढाओढच लागलेली दिसत होती. एका बराकीमध्यें तरुण मुली होत्या. तेथून जातांना कोपऱ्यांत एकट्याच बसलेल्या एका लहान मुलीकडे तिचें लक्ष गेलें.

" ही कैदी अगदीं लहान छोकरी दिसते. " ती म्हणाली, " तुरुंगांत पडण्यासारखं काय घडलं तिच्या हातून ? ती कांहीं चेहऱ्यावरून गुन्हेगार नाहीं दिसत. कोण आहे ती ? काय केलं तिनं ? "

" तिचं नांव रामकली. ती उच्च वर्णाची आणि मोठ्या कुळांतली आहे. पण तिचा स्वभाव फार दुष्ट दिसतो. तिला सावत्र आई होती आणि तिला सोडून एका माणसाबरोबर घरांतून पळून जाण्याचा हिनं प्रयत्न केला.

आईला हें कळल्यावर तिनं हिला अडविलं आणि मोठी झुंज झाली दोघींची. रामकलीनं निष्ठुरपणें आपल्या सावत्र आईला विहिरींत फेकून दिलं आणि ठार केलं. इथं ती दोन वर्षं आहे; पण कुणाशीं बोलतांना किंवा हंसतांना तिला कुणी पाहिलं नाहीं. ती नेहमीं उदास असते. कधीं उद्धटासारखी वागते. कसल्याहि शिक्षेचा तिच्यावर परिणाम होत नाहीं."

"काय भयंकर आहे!" जिल्हाधिकाऱ्याची पत्नी थरारून म्हणाली, "मोठी धोकेबाज असली पाहिजे मुलगी. पण एवढं मात्र खरं, चेहऱ्यावरून ती लहान आणि निष्पाप दिसते. हीं हलक्या दर्जाचीं माणसं बहुधा गुन्हेगार असतात आणि त्यांना सुधारणं कुणालाहि शक्य होत नाहीं. त्यांना इथं कोंडून ठेवण्यांत येतं हें बरं आहे; नाहीं तर साऱ्या जगाचा सत्यानाश केला असतां त्यांनीं. माझ्या मुलीला मी बरोबर आणलं नाहीं, हें ठीक झालं म्हणायचं. नाहीं तर ती या रामकलीच्या मदतीला लागलीच धांवली असती. कैद्यांना मदत करणाऱ्या कुठल्या मूर्खांच्या संस्थेची सभासद आहे ती. पण असलीं माणसें का कधीं सुधारतां येतात? सर्व जगांतली सदिच्छा एकत्र केली तरी यांच्यांत कांहीं बदल करतां येणार नाहीं. नाहीं का?"

"हो ना. अगदीं खरं." तुरुंगाच्या मुख्य अधिकाऱ्यानें विशेष विचार न करतां साथ दिली आणि तो ताफा पुढल्या कोठडीकडे गेला.

"**मी** नोकरीकरतां आलें आहे." शाळेच्या ऑफिसांतील हिंदी मुलीला ती इंग्लिश बाई म्हणाली, "मी 'मँाटेसरी'ची परीक्षा दिलेली आहे. या शाळेंत एक जागा आहे असं मला कळलं."

"मला वाईट वाटतं," मुलगी म्हणाली, "तुम्हांला कुणी तरी चुकीची माहिती सांगितली असावी. सध्यां आमच्या शाळेंत जागा मुळींच नाहीं."

"पण मला नोकरी मिळाली नाहीं तर मी उपाशी मरून जाईन. काय माझ्यावर प्रसंग आला आहे! माझं दैवच खोटं! मी एका मुसलमानाशीं लग्न केलं; मला वाटलं तो माझ्याशीं अगदीं एकनिष्ठ राहील. माझा देश सोडून मी इथं आलें आणि मग कळून आलं कीं त्याला बायको आणि एक मूल आहे. अर्थात् कांहीं काळ तो बायकोपासून दूर झाला. पण मी रागावलें होतें. त्याला सोडून गेलें. त्याला सुखी करण्याकरितां मीं मुसलमान धर्मसुद्धां स्वीकारला होता. पुढं त्याला सोडल्यावर मी ज्या मंडळींत मिसळत असें त्यांनीं हिंदुधर्म सर्वश्रेष्ठ आहे अशी मला शिफारस केली. आणि मी हिंदु झालें. मी माझं नांव सवितादेवी असं ठेवलं; पण काय दशा झाली माझी!"

"माफ करा, मी कामांत आहें." मुलीनें मध्येंच म्हटलें.

परंतु तिच्या बोलण्याकडे लक्ष न देतां ती इंग्रजी बाई बोलूं लागली, "पाहा, मला दारोदार हिंडावं लागत आहे. मदतीला कोणी नाहीं." आणि तिनें आपल्या डोळ्यांतील अश्रु पुसले. मुलीला तिच्याबद्दल करुणा वाटली आणि "तुम्हीं दोन दिवसांनीं या. मी मुख्य बाईंना विचारून पाहतें." असें तिनें सवितादेवीला सांगितलें.

तिचे आभार मानून सवितादेवी नाखुषीनें बाहेर पडली आणि स्वतःशीं बडबडत जाऊं लागली. ती उंच आणि थोराड होती. तिचें वय पंचेचाळीस

वर्षाचें असून सुमारें दहा वर्षांनीं ती मोठीच दिसे. पण आपण पस्तीस वर्षांच्या आहोंत असें ती नेहमी सांगे. तिनें सुती साडी परिधान केली होती. आणि तिच्या पायांत चपला होत्या, हातांत एक खादीची पिशवी असून कांहीं कागदपत्र आणि इतर सटरफटर जिनसा तीमधून डोकावत होत्या. रस्त्यावरून जातांना भोंवतीं कोण आहे याचा विचार न करतां ती स्वतःशींच बडबडत होती. एका वळणावर समोरून खालीं मान घालून येणाऱ्या एका तरुणावर ती आदळली.

" माफ करा. " असें म्हणून तो तरुण बाजूला झाला.

" ठीक. पण समोरून कोण येतंय् हें न पाहतां असे लोकांना धक्के काय देतां ? " ती जरा रागानें म्हणाली. एका मोठ्या दगडावर ती बसली आणि घाम पुसूं लागली. त्या दिवशीं फार उकाडा होत होता.

" मला फार खेद होतो, आई, तुमची मी माफी मागतों. तुम्ही पाहतांच, आई........"

" आई ! आई ! तरुण माणसा, हा उद्धटपणा सोडून दे. तुझी आई होण्याइतकी मी वयस्क वाटतें काय तुला ? कसं हें धाडस केलंस ?"

या प्रकारानें गम्मत वाटून पण बाहेर तसें न दाखवतां मान लववून तो तरुण म्हणाला, " बाई, तुमचा अपमान करण्याची माझी इच्छा नाहीं. आमच्या देशांत बाईला आई म्हणणं हें सन्मानाचं समजलं जातं. मला माहित आहे, कीं युरोपियन बायकांना तें आवडत नाहीं. कारण त्यांत वयस्कतेचा त्यांना वास येतो. माफ करा. मी जरा बसूं इथं ? "

" हो, वाटलं तर बसा. " सवितादेवी म्हणाली. तिच्या स्वरांत मोठीशी आस्था, औदार्य नव्हतें; पण आपणाला कोणीं तरी बोलायला मिळालें म्हणून तिला बरेंच वाटलें.

बराच वेळ तीं दोघें बोलत होतीं. सवितादेवीनें आपल्या सर्व जीवनांतील करुण कहाणी त्याला सांगितली.

त्यानें तिचा पत्ता टिपून घेतला आणि सवडीनुसार भेटण्याचें व मदत करण्याचें आश्वासन दिलें. त्यानें आपलें नांव आनंदकुमार असें सांगितलें.

दुसऱ्या दिवशीं भल्या पहांटे आनंदकुमार सवितादेवीचें दार ठोठावीत होता. अर्धवट झोंपेंतच तिनें दार उघडलें आणि त्याला पाहून ती चकित झाली. तो घाईघाईनें म्हणाला, "मला आंत येऊं द्या, कांहीं प्रश्न विचारूं नका. मी अडचणींत आहें आणि मला आतां लपलं पाहिजे." असें म्हणून त्यानें तिला बाजूला ढकललें आणि तो आंत शिरला. दार लावून घेतांच तो श्रमामुळें अगदीं निश्चेष्ट पडल्यासारखा झाला.

नेहमींप्रमाणें कुरकुरत सवितादेवीनें चहा तयार केला आणि आनंदाला दिला. त्यामुळें त्याला जरा हुशारी वाटूं लागली. "आपण काल भेटल्यापासून तुम्ही काय करीत होतां ?" तिनें विचारलें.

"मी पोलिसांना चुकवीत होतों." तो म्हणाला, "मी फरारी आहें. मी या प्रांतांतला नसल्यामुळं या प्रांतांत मला कोणी ओळखणार नाहीं असं वाटून मी इथं आलों; पण कुणी बदमाषानं ही बातमी पोलिसला दिली. एका मित्रानं मला हें सांगितलं म्हणून मीं राहती जागा सोडली. रात्रभर मी शेतांत हिंडत होतों, लपलों होतों. पण आतां रात्र पडायच्या आंत हें शहर मला सोडतां येणार नाहीं. म्हणून तुमच्याकडे मी आश्रयाला आलों आहें. तुम्ही कुणाला माहित नाहीं आणि मी इथं आलेला कुणी पाहिलं नाहीं. तुमची इच्छा नसेल, तर मात्र मी इथून निघून जाईन."

एवढें बोलल्यावर थकवा येऊन आनंद आडवा झाला. सवितादेवी अंग घुसळून आपल्याशींच बडबडत होती, "माझ्या जीवनांत पुष्कळ विचित्र अनुभव आले; पण या याच्या गोष्टीवर मात्र माझा विश्वास बसत नाहीं. माणसाबद्दल–विशेषतः पुरुषांबद्दल मला खूप आकर्षण वाटतं. पण तेच पुढं मला दगा देतात. हें पाहा, आनंद, मी तुला इथं थारा देणार नाहीं. मी दयेच्या पोटीं पुष्कळ चांगलीं कृत्यं केलीं आहेत; पण त्यांतून कांहींच निष्पन्न झालं नाहीं. मी जाफरशीं लग्न केलं. मला वाटलं कीं माझ्यासारखं कुणी मायेचं माणूस त्याला अवश्य हवं. याचा मोबदला मला काय मिळाला ? तर एक सवत मला वागविण्याची वेळ आली. माझ्या मृदु स्वभावामुळं जाफरच्या या लग्नाआधींसुद्धां मी तीन वेळ अशी फसलें होतें. आतां तूं आलास आणि माझ्या चांगुलपणाचा फायदा घेऊं लागला आहेस. माफ

कर. मी इथं तुला ठेवणार नाहीं. पोलिस पकडो अगर न पकडो. तूं इथून चालायला लाग. नाहीं तर मीच पोलिसला बोलावणं पाठवीन. ”

कसाबसा बाहेर येत आनंद म्हणाला, “ तुम्हांला त्रास देणार नाहीं मी. मला आतां जरा बरं वाटतंय्. तुम्हीं दिलेल्या चहामुळं हुषारी आली. विश्रांतीला थोडा वेळ जागा दिल्याबद्दल मी तुमचे आभार मानतों. ” दार उघडून सावधगिरीनें इकडे तिकडे पाहत तो चालूं लागला. तो वीस एक पावलें गेला असेल तोंच दोघां पोलिसांनीं त्यावर झडप घातली आणि त्याला हूं का चूं करण्याची संधी न देतां जवळच दडून बसलेल्या पोलिसां-कडे नेलें.

आनंद जाऊन पंधरा मिनिटें झालीं असतील तोंच दारावर सवितादेवीला पुन्हां थाप ऐकूं आली. “ काय कटकट आहे !” ती म्हणाली. “पोरानं पुन्हां परत यायचं ठरविलेलं दिसतंय्. इतर सर्व पुरुषांप्रमाणं हाही माझ्यावर आषक्त झाला कीं काय?” आपल्याशींच हसत तिनें दार उघडलें. पण नुसता आनंदच नव्हे, तर त्याबरोबर एक पोलिसांची तुकडी आलेली पाहून तिच्या आश्चर्याला पारावार राहिला नाहीं. ती कांहीं बोलणार इतक्यांत फौजदार पुढें होऊन म्हणाला, “ बाई, तुमचं नांव काय ? तें सांगा. आणि नंतर आमच्याबरोबर पोलिस ठाण्यावर चलण्याची कृपा करा. ”

“ मी तुम्हाला नांव सांगणार नाहीं. आणि पोलिस ठाण्यावरही येणार नाहीं. तुम्ही मला सक्ति करूं शकत नाहीं. मीं कांहींही केलं नाहीं. आणि ही खोली मी सोडणार नाहीं. इथून चालते व्हा; मला उगीच त्रास देऊं नका.”

“ माफ करा, बाईसाहेब. ” फौजदार म्हणाले, “ तुम्हांला आमच्याबरोबर आलं पाहिजे. हा मनुष्य तुमच्या खोलींतून बाहेर पडला, त्या अर्थी त्याची व तुमची ओळख असावी असा तर्क करण्यास हरकत नाहीं. तो फरारी इसम आहे. आणि त्याला जो कोणी आश्रय देईल, तोहि कायद्यानं त्याच्याइतकाच दोषी ठरणार आहे. ”

“ पण फौजदारसाहेब, मी त्याला ओळखत नाहीं. कालच त्याला मी पहिल्यानं रस्त्यावर पाहिलं आणि तो कोण, कुठला, हें मला माहितहि नव्हतं. आम्ही दोन शब्द बोललों. तो माझ्या घरापर्यंत आला, आणि नंतर निघून

गेला. तुमच्याबरोबर मी येणार नाहीं. कारण मी तुम्हांला काय माहिती देऊं शकणार ? कृपा करून जा कसे. "

" तुम्हांला त्याची माहिती नाहीं, आणि पहाटे पांच वाजतां तो तुमच्या घरांतून बाहेर पडतो." फौजदार गरजले, " बाई, उगीच वाद करूं नका. आमच्याबरोबर चला. नाहीं तर तुम्हांला जबरदस्तीनं घेऊन जावं लागेल."

" ठीक आहे. येतें मी तुमच्याबरोबर. पण तुम्हांला याचा पस्तावा होईल. तुम्हांला माहिती नसेल. पण मी बर्नार्ड शॉ आणि इतर कित्येक प्रसिद्ध व्यक्ति यांची नातेवाईक आहें. पश्चात्तापाची पाळी येईल पाहा तुमच्यावर !" एवढें सांगून तिनें पिशवी हातांत घेतली व ती खोलीबाहेर आली.

चालतां चालतां फौजदार मध्येंच थांबून म्हणला, " हा बर्नार्ड शॉ कोण हो ? मोठा वजनदार अन् प्रतिष्ठित असामी आहे वाटतं !" त्यानें शॉचें नांव ऐकलें नव्हतें; पण कदाचित् आपणावर कांहीं आफत ओढवेल कीं काय, याची त्याला भीति वाटत होती. तिचें व शॉचें नातें असलें तरी बाकी त्याला त्याचें काय होतें म्हणा ! फौजदाराकडे सवितादेवीनें एक तिरस्कार-युक्त कटाक्ष टाकला आणि त्याच्या प्रश्नाचें उत्तर देण्याचें टाळलें.

× × ×

पोलिसच्या मुख्य अधिकाऱ्यासमोर सवितादेवी उभी होती. तो तिला प्रश्न विचारीत होता.

" तुमचं नांव काय ?"

" सवितादेवी जाफरखान."

अधिकाऱ्यानें तिच्याकडे पाहिलें आणि आपला राग मनांतल्या मनांत दाबून तो म्हणाला, " तुमचं खरं नांव; खोटं नव्हे."

" काय वेडे आहांत ! मी माझं खरं नांव सांगत नाहीं; असं वाटतं काय तुम्हांला ? हेंच माझं खरं नांव."

" बाई," शांतपणें बोलण्याचा प्रयत्न करीत तो अधिकारी म्हणाला, " तुम्ही सवितादेवी जाफरखान असं नांव लावूं शकत नाहीं. असं गंगा-जमनी नांव असेल कसं ? तुमचं हिंदु नांव तरी असेल, किंवा मुसलमानी नांव असेल."

"काय बरं? भल्या माणसा, मी हवं तें नांव लावीन. पण तुमची जिज्ञासा तृप्त करण्याकरितां सांगतें कीं मी एका मुसलमानाशीं विवाह केला होता आणि आम्ही जेव्हां विभक्त झालों, तेव्हां मीं नांव बदललं. मी पुनः सुद्धां बदलीन. तुम्हांला काय करायचं आहे? लक्षांत ठेवा, इंग्लंडमधील बऱ्याच मोठ्या लोकांची मी नातेवाईक आहें. बर्नार्ड शॉची मी चुलत बहीण असून..."

"बाईसाहेब, तुम्ही बड्या लोकांच्या नातेवाईक आहांत, त्याला माझा कांहींच इलाज नाहीं. मला माझं कर्तव्य बजावलं पाहिजे. मीं तुम्हांला अधिक प्रश्न विचारणार नाहीं. तें काम कोर्टच करील. पण हा जो तुमचा चुलतभाऊ आहे अन् ज्याचं नांव तुम्ही सारखं घेतां, तो कोण सांगा पाहूं. या नांवाची आम्हीं दोन वेळां नोंद करून घेतली आहे."

"बर्नार्ड शॉ." सवितादेवी म्हणाली.

अधिकाऱ्यानें वहीवर नोंद केली, "बर्नार्ड शॉ." नंतर पुनः डोकें वर करून त्यानें विचारलें, "तो काय करतो?"

"कमाल आहे माणसा तुझी! तो लिहितो–"

"काय लिहितो?" मध्येंच त्यानें प्रश्न केला.

हातवारे करीत सवितादेवी म्हणाली, "हें पाहा, हें सर्व मुद्द्याला सोडून आहे. तुझ्यासारख्या मूर्ख माणसाशीं बोलून मी थकलें. याहून अधिक उत्तरं मी देणार नाहीं. इतकंच पुरे."

आपल्या वहीवर अधिकाऱ्यानें पुढील मजकूर खरडला, "शॉसंबंधींच्या प्रश्नांना उत्तरें देण्यास कैदी स्त्रीनें नकार दिला. ती शिवीगाळ करूं लागली."

दुपार झाली होती. उष्मा भयंकर होत होता. दारें-खिडक्यांतून उत्तर हिंदुस्थानांत प्रसिद्ध असलेला उष्ण वारा तुरुंगांत स्वैरपणें वाहत येत होता. उन्हाळ्याच्या पेटलेल्या भट्टींत थंडपणा आणण्याचें एकमेव साधन म्हणजे वाळ्याचे पडदे. पण ते तेथें कुठून असणार? राजबंदी चटयांवर धापा टाकीत पडले होते. बोलण्याचा किंवा वाचण्याचा उत्साह त्यांना नव्हता. त्या उकाड्यांत साधे गुन्हेगारसुद्धां कामाची विश्रांति मिळाली तरी कांहीं बोलूं शकत नव्हते. सारा तुरुंग धुळीनें आणि भयाण शांततेनें व्यापलेला दिसत होता.

बाहेरचें फाटक वाजल्यानें या शांततेचा भंग झाल्यासारखें झालें. नवीन कैदी आल्यानें दुपारची झोंप मोडली म्हणून मेट्रन तडकून बोलत होती. मधून मधून कुणी स्त्री इंग्रजी भाषेंत तिच्याशीं बोललेली ऐकूं येत होती. दोघी जवळ आल्यावर राजबंदिनी उत्कटतेनें कोण आहे म्हणून पाहूं लागल्या. एक उंच, उतार वयाची, थोराड स्त्री पुरुषासारखी चालत आहे आणि मेट्रन खवळून हातवारे करीत बोलत आहे असें त्यांना दिसलें. तिचे केस रंगविलेले होते आणि त्यांत विविध छटा दिसत. ती साडी नेसली होती. तिच्या पायांत चपला होत्या. कपाळावर कुंकुमतिलक होता. ती बाई म्हणजे दुसरी तिसरी कोणी नसून सवितादेवीच होती. राजबंदिनींपैकीं एकाच मुलीनें तिला पूर्वी पाहिलें होतें. शाळेच्या कचेरींत सवितादेवीशीं बोलणारी तीच ती मुलगी. " विचित्र आहे !" मुलीनें विचार केला. " पुन्हा आम्ही जेल-मध्यें भेटतों आहोंत. काय या बिचारीनं केलं, कुणाला ठाऊक !"

त्या बराकीवरून जात असतां मेट्रन म्हणाली, " मुलींनो ! प्रणाम. आज मी काय चीज आणली आहे पाहा !" आपला उल्लेख केलेला पाहून सविता-देवीनें एकदां राजबंदिनींकडे पाहिलें, आणि एकदां मेट्रनकडे दृष्टि टाकली आणि ती बडबडूं लागली, " काय आणलंय तुम्हीं असं वाटतं ? प्राणि-संग्रहालयांतून एखादं जनावर तर आणलं नाहीं ? मी कोण आहें हें जर तुम्हांला कळलं तर थरकांप उडेल तुमचा !"

आणि मग राजबंदिनींकडे न पाहतां मेट्रनबरोबर ती तिच्या खोलीकडे वळली. नंतर आपली बाडबिछाईत सोडूं लागली. भयंकर उकाडा होत असतांना सुद्धां कांहीं तरुण राजबंदिनी गजांत तोंड घालून सवितादेवी-बद्दल मेट्रनला माहिती विचारूं लागल्या.

मेट्रन थोडी गप्पाष्टकाला उत्सुकच झाली होती. आणि सर्व राजबंदिनींचें आपण केंद्रस्थान व्हावें असेंही तिला वाटत होतें.

" अरे देवा ! या बयाला तुम्हीं कचेरींत पाहिलीच असेलच कीं ! ती जेलच्या मुख्य अधिकाऱ्यावर मोठ्यानं खेकसली आणि आपल्याला तुरुंगांत टाकल्याबद्दल त्यांना शिक्षा भोगावी लागेल असं तिनं बजावलं. आपण इंग्लिश नसून आयरिश आहोंत आणि बर्नार्ड शॉ नांवाच्या कोण्या इसमाचे

आपण नातेवाईक आहोंत, असं ती सांगत होती. पण तो माणूस कोणाला ठाऊक नाहीं, त्यामुळं तिचं वजन पडलं नाहीं आणि म्हणून तर ती फार भडकली. ती कच्च्या कैदेंत आहे आणि तिच्यावर खटला चालू आहे. एका फरारी माणसाला तिनं आश्रय दिला. मोठाच अपराध आहे! पहांटे पांच वाजतां तिच्या घरांतून बाहेर पडतांना त्याला लोकांनीं पाहिलं, तरी ती म्हणते माझी-ह्याची पूर्वीची ओळख नाहीं. तरुणाबरोबर गमती करणाऱ्या या थेरडीची गम्मत तर पाहा!" मेट्रन असें बडबडत होती. वय व चेहरा या दृष्टींनीं सवितादेवीची ती जुळी बहीण शोभली असती. इतकें बोलून अर्धवट टाकलेली झोंप घेण्याकरतां ती निघून गेली.

नंतर कांहीं वेळानें सवितादेवी राजबंदिनींकडे वळली. त्यांची बराक तिच्या कोठडीजवळच होती.

"काय म्हणत होती ही जखीण? माझी खात्री आहे, माझ्याबद्दलच सांगत असली पाहिजे. तुम्हांला ठाऊक आहे, मला म्हणे राजबंद्यांसारखं वागवणार नाहींत. कारण माझी गुन्ह्याची जात वेगळी आहे म्हणे! असला मूर्खपणा मीं कधीं ऐकला नव्हता. तुम्ही इथं सारे कायदे मोडतां आहांत, तरी तुम्हांला उत्तम वागणूक मिळते. आणि मी कांहींच गुन्हा केलेला नाहीं. पुन्हां मी इंग्लिश आहे आणि मला वेगळ्या तऱ्हेनं वागवलं पाहिजे."

"तुम्ही आयरिश आहांत ना?" एक मुलगी म्हणाली.

"होय, मी अर्धी आयरिश आहें." खेदपूर्वक सवितादेवीनें उत्तर दिलें. पूर्वी भेटलेली ती मुलगी समोर आहे हें तिला कळून आलें. सवितादेवी खो खो हंसूं लागली, "हा! हा! गजाच्या कोठडींत तूं मोठी मजेदार दिसतेस! कचेरीसारखीच मौज वाटते ना तुला इथं? आपण अशा ठिकाणीं भेटलों, हें किती आश्चर्य आहे!" उत्तराची अपेक्षा न ठेवतां सवितादेवी आपला बिछाना घालूं लागली. मुली गप्प बसल्या. दुपारीं आणि संध्याकाळीं ती आपल्याशीं कांहीं तरी बडबडत होती. तिची कोठडी जेव्हां संध्याकाळीं उघडली, तेव्हां प्रथम ती बाहेरच येईना. मुलींनीं तिला जरा हातपाय मोकळे करण्यास सांगितलें; कारण पुन्हां सकाळपासून अडकून पडायचें होतें. ती बाहेर आली, पण मुलींचे आभार वगैरे न मानतां दूर दूर राहूं लागली. पुन्हां कोठडींत घातल्यावर तिनें जेल, हिंदी लोक, इंग्लिश लोक,

यांच्यावर तोंडाची सरबत्ती सुरू केली. " मी श्रीमंत घराण्यांतली आहे." ती म्हणू लागली, " मला त्यांना असं वागवतां येणार नाहीं. माझीं प्रसाधनाचीं साधनं आणि डोक्याला लावायचा रंग या जनावरांनीं माझ्याजवळ राहूं दिला नाहीं. पाहा, यांची मी एक दिवस खोडकी जिरवीन ! तुम्ही राजबंदिनी जेलमध्यें उगीच काळ वायां दवडीत आहांत. हे माझे क्रूर देशबांधव तुम्हांला स्वराज्य देतील असं वाटतं काय ? पाहा, ते मला कसे वागवीत आहेत ! कारण काय, तर मी एका हिंदी माणसाशीं लग्न केलं. इंग्लिश स्त्रीनं हिंदी माणसाशीं लग्न केलं कीं खवळतात ते. आणि पुन्हां मी या अधिकारी लोकांना माझ्याशीं प्रणयचेष्टा करूं देत नाहीं. अर्थात् मला ठाऊक आहे कीं ते माझ्याकडे आकर्षित होतात." इतकें बोलून ती खांदे उडवून निघून गेली !

" अरेरे, गरीब बिचारी !" पूर्वी सवितादेवीला भेटलेली ती मुलगी म्हणाली, " हिला कळूं नये का कीं हिला एकदां पाहिल्यावर दुसऱ्यांदां कोणी हिच्याकडे दृष्टि टाकणार नाहीं ? किती करुणास्पद आहे स्थिति हिची ! मला वाटतं, हिची सुटका व्हावी. कारण तिचा अगदींच तोल गेलेला दिसतो. "

दुसऱ्या दिवशीं मेट्रन त्या आवारांत शिरतांच सवितादेवी तिच्याकडे गेली आणि म्हणाली, " काय मेट्रनबाई, केसांना लावायचा माझा कलप तुम्ही स्वतःकरितां ठेवलात वाटतं ? द्या तो परत. नाहीं तर मी वरिष्ठ अधिकाऱ्यांना कळवीन. माझं काजळहि मला पाहिजे. डोळे कोण दुखत आहेत माझे ! कृपा करून तें कुणाला तरी आणायला पाठवा. "

" काजळ आणि कलप कशाला ग तुला बया ?" मेट्रन निष्ठुरपणें म्हणाली, " पांच वर्षांची शिक्षा झाली आहे तुला. जगून वांचून सुटलीस–कठीणच वाटतं तें मला–तर इतकी पिकून जाशील अन् आणखीच जख्ख दिसशील. या काजळ-कलपाचा कांहीं उपयोग होणार नाहीं तुला. म्हणून तें सर्व विसरून जा. मी आतां पाठवले ते जेलचे कपडे अंगावर घाल."

ही भयंकर शिक्षा ऐकून राजबंदिनी चकित झाल्या. सवितादेवीचा मेंदू ठीक नाहीं. साहजिकच एवढी शिक्षा तिला देणें हें फार मोठें क्रौर्य होतें.

" पांच वर्षं !" ती किती तरी वेळ आपल्याशींच पुटपुटत होती. " या गलिच्छ जागेंत, असल्या भेसूर वातावरणांत, कुणी सुसंस्कृत स्नेहीसोबती

नसतां पांच वर्षं घालवायचीं ! अरे देवा !" दोन्ही हातांत डोकं धरून व तसेंच कांहीं वेळ राहून विव्हळत ती म्हणाली. कांहीं राजबंदिनी तिच्याकडे आल्या आणि आपणांकडून तिला कांहीं मदत होण्यासारखी असल्यास ती करण्याची इच्छा त्यांनीं प्रदर्शित केली. त्या कोठडींत शिरतांच तिनें त्यांच्याकडे रोखून पाहिलें आणि म्हटलें, "काय पाहिजे तुम्हांला इथं ? मला तुमची दया नको, मदत नको, कांहीं नको. तुमच्यासारखी निराधार नाहीं मी. माझं वजन मोठं आहे आणि इथून मी सहज बाहेर पडूं शकेन. शिवाय सुपरिंटेंडंट जरा ढिला माणूस आहे असं मी ऐकलं आहे. त्याला घेरण्याच्या कामाला मला लागलं पाहिजे." असें म्हणून तिनें एक लहान आरसा समोर धरला, चेहऱ्याला पावडर फांसली, केस व्यवस्थित केले आणि राजबंदिनींकडे पाठ फिरवून ती परतली. ही खरोखरची वेडी आहे कीं मुद्दाम असें सोंग करीत आहे हें न कळून नाइलाजानें त्या राजबंदिनी आपल्या बराकीकडे परतल्या.

अडीच वर्षांनीं सवितादेवी सुटली. ज्या तरुणाला आश्रय दिल्याचा तिच्यावर आरोप होता, तो तरुण फांशीं गेला होता !

रस्ते नेहमींप्रमाणें भरलेले होते. जो तो आपापल्या कामाला चालला होता. सर्वजण आपापल्या विचारांत गर्क असल्यामुळें दिव्याच्या खांबाला टेंकून उभ्या असलेल्या एका सडपातळ मुलीकडे कुणाचेंच लक्ष गेलें नाहीं. गार वारा झोंबत होता आणि ती किंचित् थरथरत होती. ज्यांनीं तिच्याकडे सहज दृष्टि टाकली, त्यांना ती कुणाची तरी वाट पाहत आहे असें वाटलें. ती वयानें सोळा वर्षांची होती; पण ती त्याहिपेक्षां लहान दिसे. जाड्या-भरड्या पातळावर तिनें एक पातळ कोट चढविला होता. तिचे हात खिशांत होते. आणि ती एका दिशेकडे पाहत होती. एखाद्यानें जर निरीक्षणपूर्वक पाहिलें असतें, तर तिचें शरीर किती उत्कट आवेगानें कांपत आहे हें त्याला कळलें असतें. ती पूर्ण गारठलेली होती. जीवंतपणा असा काय तो फक्त डोळ्यांत होता.

दुपार झाली होती. जेवणाची वेळ झाली तसतशी रहदारी वाढूं लागली. जवळ जवळ दोन तास ती मुलगी पुतळ्यासारखी स्तब्ध उभी होती. आतां मात्र तिला कंटाळल्यासारखें वाटूं लागलें. तिनें जरा आळोखेपिळोखे दिले. कांहीं वेळानें एक मोटर-सायकल जवळून गेली. त्याबरोबर ती मुलगी पुन्हां सज्ज होऊन उभी राहिली. अंतरंगांत उत्कट खळबळ असून बाहेर मात्र ती न दाखवितां मीना ( तिचें नांव ) शांत उभी होती. खिशांतल्या जड धातूला स्पर्श करतांना तिचे हात जरा कांपत होते. आघाडीची संरक्षक मोटर गेली आणि मीनापासून कांहीं अंतरावर उभी राहिली. त्याच्या मागून एक मोठी काळी सेडन गाडी येऊन ती गव्हर्नमेंट हाउसच्या पायथ्यापाशीं उभी राहिली. ती उभी राहतांक्षणींच तीमधून झकपक पोषाक केलेले दोन चप-राशी खालीं उतरले आणि त्यांनीं झटकन जाऊन मोटरीचें दार अदबीनें

उघडलें. बाहेर उतरणाऱ्या इंग्रजी अधिकाऱ्याच्या येण्याची गुप्तता राखण्यांत आली होती, तरीहि दोन हिंदी अधिकारी त्याच्या स्वागतार्थ तेथें होतेच. तो आपली टोपी हातांत घेऊन खालीं उतरला. हा मनुष्य अत्यंत तिरस्करणीय समजला जात होता. हिंदी लोकांवर जुलूम करण्यांत यानें आपल्या सर्व जातभाईंवर ताण केली होती. तो पुन्हां टोपी डोक्यावर बसवूं लागला. त्या वेळीं मीनानें रिव्हॉल्वर काढून हातांत घेतलें आणि निश्चल हातानें तिनें नेम धरला. कांहीं मिनिटांपूर्वीच हें कृत्य आपल्या हातून कसें पार पडेल याविषयीं साशंकतेनें ती विचार करीत होती; पण आतां शंका, दिरंगाई, यांना अवकाशच नव्हता. ज्या माणसानें अनन्वित संकटें आपल्या हिंदी बांधवांवर आणिलीं, तो तिच्यासमोर उभा होता. त्याच्याविषयीं तिरस्कार आणि त्याला जगांतून नाहींसें करण्याची इच्छा यांनीं तिचें अंतःकरण भरून गेलें होतें. त्यानें एक दोन पायऱ्या ओलांडल्या असतील, तोंच त्या थंड हवेंत पिस्तुलाचे बार उमटले एक...दोन...छातीला हात दाबून तो मनुष्य खालीं पडला. त्याच्या भोंवतालचे लोक चकित होऊन उभे राहिले. एक क्षण कुणी हालचाल केली नाहीं. नंतर आरडाओरडा सुरू झाला. बऱ्याच मंडळींनीं त्या जखमी साहेबाला आंत कचेरींत नेलें. याच कचेरीची पाहणी करावयास तो आला होता. डॉक्टरला बोलावणें पाठविण्यांत आलें. इमारतींतून थोडया उशीरांच बाहेर पडलेल्या पोलिसांनीं तिथला जनसमूह आवरून धरला. त्यांतले कांहीं पोलिस खुनी इसमाचा शोध करण्याकरितां इकडे तिकडे धांवूं लागले. कांहीं जणांना पकडण्यांत आलें;पण त्या दिव्याच्या खांबाजवळ, जणूं कांहीं झालेंच नाहीं अशा मुद्रेनें उभी असलेल्या त्या मुलीकडे मात्र कोणाचें लक्ष गेलें नाहीं.

आपल्याला करायचें तें करून झाल्यावर मीनानें शांतपणें आपल्या खिशांत रिव्हॉल्वर टाकलें आणि त्याच जागीं ती उभी राहिली. हें कृत्य करण्याची तिची पहिलीच खेप होती. आणि याचे परिणाम काय होतील हें ठाऊक असूनहि लोकांचें लक्ष न वेधावें म्हणून ती पळाली नाहीं. तरी पण तिनें तें साहस करण्याचें योजलें. त्या जनसंमर्दाकडे दृष्टि टाकून सावकाशपणें ती जाऊं लागली. नंतर एका गल्लींत शिरल्यावर तिनें शक्य तितक्या जोरानें

पळण्यास सुरुवात केली. एका वळणावर कुणावर तरी आदळून ती खालीं पडली. ती उभी राहिली तों खिशांतील पिस्तुल खालीं पडलें. ज्याच्यावर ती ती आदळली, तो एक पोलिसच होता ! तिनें तें पिस्तुल लाथेनें उडवण्याचा प्रयत्न केला; पण कायद्याच्या त्या प्रतिनिधीची गरुडदृष्टि तिच्यावर पडलीच. त्यानें एका हातानें मीनाला धरलें व दुसऱ्या हातानें पिस्तुल उचललें आणि तिला घेऊन तो नजीकच्या पोलिस स्टेशनवर गेला. इंग्लिश अधिकाऱ्यावर गोळीबार झाल्याचें वृत्त त्याला कांहीं ठाऊक नव्हतें. पहिल्यानें मीनानें सुटण्याची धडपड केली; पण व्यर्थ आहे असें जेव्हां तिला कळून आलें, तेव्हां ती सरळ चालूं लागली.

सरकारी कचेरींत गोळीबाराची बातमी वणव्यासारखी पसरली. जरी सर्व प्रकार समाप्त झाला होता, तरी लोकांना दहशत वाटत होती. कांहीं अधिकाऱ्यांनीं दारांना कुलुपें घातलीं. पण आंत त्यांना असुरक्षित वाटत होतें. कांहींजण कपाटांमागें आणि टेबलाखालीं दडले, कांहींजण आपण विशेष धीट आणि बेफिकीर आहोंत असें दाखवण्याकरितां मेजाजवळ बसून राहिले. पण कारकून किंवा शिपाई आंत येण्याकरतां जेव्हां दार उघडी, तेव्हां दाराच्या आवाजानें त्यांच्या छातीचे ठोके जलद पडूं लागत आणि त्यांना भ्याल्यासारखें वाटे. एका सोळा वर्षांच्या कोवळया मुलीनें अशी दंगल उडवून दिली.

× × ×

उंच, सुसंस्कृत, सडपातळ, कांहींशी नाजुक, अशी एक स्त्री स्त्रियांच्या तुरुंगांतील एकां कोठडींत बसली होती. एक जाडीभरडी, पांढरट, तांबड्या कांठाची साडी तिनें परिधान केली होती. हा ब वर्गाच्या कैद्याचा पोषाख होता. एका कोपऱ्यांत ती दोर वळण्याचें काम करीत असतां तिला खोकल्याची एवढी भयंकर उबळ येई कीं छाती फुटते कीं काय असें होऊन जाई. आणि मग श्रांत होऊन विश्रांति घेण्यासाठीं ती जरा भिंतीला टेकून बसे. एवढ्यांत सदोदित जागरूक राहणाऱ्या त्या पहारेकरिणीची नजर गेली कीं त्या दुर्दैवी स्त्रीवर शिव्यांचा मारा झालाच सुरू. निःश्वास टाकून पुनः ती आपलें काम सुरू करी. तुरुंगाच्या जीवनाची आज पुष्कळ वर्षें तिला संवय

झालेली होती. जीवनांत भयंकर कष्ट तिच्या वांटयाला आले होते. मीनाच्या ( हो ! मीनाच होती ती ) षोडशवर्षा मूर्तीशीं आजच्या तिच्या चेहऱ्याचें फारच थोडें साम्य दाखवितां आलें असतें. पंधरा वर्षें तिनें तुरुंगांत घालविलीं होतीं. एवढया काळांत ती मध्यमवयीन स्त्री दिसूं लागली होती. ३१ वर्षांपेक्षां तिचें वय किती तरी जास्त दिसत होतें. तिची ताठ शरीरयष्टि वांकली होती. तिचा चेहरा सुकट व सुरकुतलेला दिसत होता. तिच्या काळयाभोर केशकलापावर करडा रंग चढला होता. तिचे डोळे काय ते पूर्वीसारखेच होते. पूर्वीचेंच तेज व चमक त्यांत होती आणि कष्टापत्तींनीं त्यांत यत्किंचित् निस्तेजपणा आला नव्हता.

अनेक वर्षें एकांतवासांत घालविल्यावर एका मोठया तुरुंगांत मीनाची बदली करण्यांत आली होती. या तुरुंगांत मोठल्या राजबंदिनी ठेवण्यांत येतात असें तिला कुणी सांगितलें होतें. त्यांची भेट होईल व त्यांच्याशीं बोलायला मिळेल, अशा आशेनें ती वाट पाहत होती. तिच्या आतांपर्यंतच्या कैदी जीवनांत कुणी राजबंदिनी भेटली नाहीं. गुन्हेगार स्त्रियाच तिच्या नेहमींच्या सोबती असत आणि त्यांची भीति वाटत असल्यानें ती नेहमीं त्यांच्यापासून दूरदूरच असे. तिला पुस्तकें वाचायला मिळत, तेवढाच काय तो तिचा वेळ बरा जाई. पहिलीं कांहीं वर्षें गेल्यावर तिनें घटिकापळें मोजायचें सोडून दिलें होतें.

पहिले कांहीं आठवडे मीनाला कुणाहि राजबंदिनीला भेटूं दिलें नाहीं. ती गजांतून मोठया आशाळभूत दृष्टीनें त्यांच्याकडे पाही. अखेर पाषाणहृदयी मेट्रनलासुद्धां तिची दया आली आणि तिनें तिला राजबंदिनींपैकीं हव्या त्या स्त्रीशीं बोलण्याची तिला परवानगी दिली. इतके दिवस असा अनुग्रह तुरुंगात तिच्यावर कधीं कुणीं केल्याचा तिला अनुभव नव्हता; त्यामुळें झरलेल्या डोळयांनीं तिनें मेट्रनचे आभार मानले. पण एकदां परवानगी मिळाल्यानंतर मात्र ती स्वतःच राजबंदिनींकडे जावें कीं न जावें याचा विचार करूं लागली. या सर्व राजबंदिनी कट्टया अहिंसावादी आहेत असे तिला कळले. आपण स्वतः तर दहशतवादी. त्या कदाचित् आपणाला धिक्कारतील किंवा कटु शब्द बोलतील आणि तें आपणाला सहन होणार नाहीं, असें मीनाला

वाटलें. तिच्या सर्व तारुण्यांत कौटुंबिक जीवनाचा ओलावा तिला मिळाला नव्हता. ज्यांनीं मायेची वृष्टि करावयाची, तीं माणसें दूर होतीं. आपल्या प्रेमाच्या माणसांत ज्या वयांत इतर मुली सुरक्षितपणें राहतात, त्या वयांतील सारीं वर्षें मीनानें दूर तुरुंगाच्या कोठडींत एकांतवासांत, प्रेमासाठीं व मायेच्या शब्दासाठीं व्याकुळ होऊन काढलीं होतीं. पण तिची भूक अतृप्तच राहिली. इतके दिवस प्रेमासाठीं ती अधीर होऊन राहिली आणि अद्यापिही ती अधीरता कायमच होती. राजबंदिनींना आपण आवडलों नाहीं किंवा त्या आपल्याशीं बोलल्या नाहींत, तर आपलें हृदय दुभंगून जाईल. मीनानें विचार केला, "नको. या अज्ञात प्रदेशांत न शिरणंच बरं नाहीं का ? पंधरा वर्षं मीं अशींच काढलीं. राहिलेलीं पांच वर्षेंहि काढीन." ती परतून आपल्या कोठडीकडे जाऊं लागली. ती कांहीं पाउलें गेली असेल तोंच तिच्या खांद्यावर कुणी हात ठेवल्याचा तिला भास झाला. वळून पाहते तों एक तरुण मुलगी तिच्याकडे पाहून हंसत असलेली तिला दिसली. ती मीनाला म्हणाली, "तूं आमच्या बराकीकडे येत होतीस ना ? मग विचार बदललास आणि परत कां निघालीस ? तूंसुद्धां राजबंदिनीच आहेस ना ? ये आणि आमच्याशीं बोल. आम्ही कांहीं दिवसांपूर्वीं इथं आलों. पण आम्हीं तुला पूर्वी पाहिलं नव्हतं. चलतेस ना आमच्या बराकींत ?"

"मी आभारी आहें." एवढें बोलून मीना त्या मुलीच्या मागोमाग राजबंदिनींच्या बराकींत गेली. सर्व राजबंदिनींनीं सहास्य मुद्रेनें तिचें स्वागत केलें. प्रेमासाठीं भुकेलेलें मीनाचें हृदय त्यांच्याकडे एकदम आकृष्ट झालें. "मी राजबंदिनी आहें; पण तुमच्या पंथाची नाहीं. मी दहशतवादी होतें आणि परकीय सत्तेचं जोखड दूर करायला हिंसेशिवाय दुसरा उपाय नाहीं अशी माझी श्रद्धा होती; पण तो मार्ग बरोबर आहे याची आतां मला खात्री वाटत नाहीं; पण तुमचाहि मार्ग बरोबर आहे असा माझा विश्वास नाहीं; पण मी कांहीं न्यायाधीश नाहीं आणि आपल्या ओळखीला वादविवादानंच सुरुवात कशाला करायची ?" मीना म्हणाली, "बाह्य जगाशीं संबंध तुटून आज पंधरा वर्षं झालीं. एवढ्या दीर्घ काळांत बाहेरच्या जगांत काय चाललं आहे याची कल्पना नाहीं मला. कित्येकदां अनेक महिन्यांचीं जुनीं वर्तमानपत्रं मिळतात मला, त्यामुळं कांहीं हकीगती कळतात, इतकंच."

" पंधरा वर्षं ? " अनेक स्त्रिया एकदम उद्गारल्या, " इतके दिवस तूं इथंच तुरुंगांत आहेस ? "

" हो. " मीना म्हणाली, " या ना त्या तुरुंगांत मिळून मीं पंधरा वर्षं काढलीं. माझी आई मरायला टेकली तेव्हां पॅरोलवरसुद्धा मला घरीं जायला परवानगी मिळाली नाहीं. तुम्हांपेक्षां आमच्यासारख्यांना फार क्रूरपणं वागवतात ते. कारण आम्ही दहशतवादी त्यांच्या मतानं फार भयंकर असतों."

मीनानें सांगितलेली तिची सर्व कहाणी त्यांनीं ऐकली. पण तीवर त्यांचा विश्वासच बसेना. एक मुलगी म्हणाली, "पण तूं हिंसावादी दिसत नाहींस ग ! तुझा चेहरा व बांधा इतका सौम्य आहे ! तूं लोकांना गोळ्या घालशील हें संभवनीयच वाटत नाहीं मला. "

मीना हंसली. या पंधरा वर्षांत कदाचित् पहिल्यानेंच तिची ही हंसण्याची वेळ असेल. " दहशतवादी कसे दिसावेत असं वाटतं तुम्हांला ? भेसूर आणि निष्ठुर ? आम्ही इतर माणसासारखेच असतों. उगीच कांहीं आम्ही माणसांना मारीत सुटत नाहीं. माझे कांहीं शूरांतले शूर स्त्रीपुरुष मित्र दिसायला इतके सौम्य व मवाळ आहेत कीं बंदुकीचा बार ऐकल्यानं यांना धडकी भरेल, असे त्यांना पाहून वाटेल तुम्हांला !" पुनः मीना हंसली आणि म्हणाली, " माझ्या कांहीं भयंकर मित्रांची आणि तुमची गांठ पडावी असं मला फार वाटतं. " पण तेवढ्यांत तिच्या चेहऱ्यावरचें हास्य मावळलें आणि त्याची जागा औदास्यानें घेतली.

" काय झालं ? " एका मुलीनें तिला घाबरून विचारलें.

" नाहीं, कांहीं नाहीं. " मीना म्हणाली, " मी माझ्या सहकाऱ्यांबद्दल कुणापुढंहि बोललें नाहीं. अलीकडे कित्येक वर्षांत त्यांची वार्ता नाहीं. त्यांचं काय झालं असेल, ते कुठं असतील, कुणाला ठाऊक ! कांहींना माझ्यासारखीच दशा भोगावी लागत असेल आणि कांहीं मेलेहि असतील. पण तुम्हांला ही कहाणी सांगून खिन्न कशाला करूं मी ? आतां सांगा पाहूं बाहेर काय चाललें आहे, मी जें जग पार विसरून गेलें त्यांत कांय काय फरक झाले आहेत ? "

त्या पुष्कळ वेळ बोलत बसल्या. मीनाला त्यांनीं शक्य तेवढें वृत्त सांगितलें. जिवंत व ओळखीच्या जगापासून तोडलेला आपण एक एकाकी जीव आहोंत, ही तिची भावना हळूहळू कमी होत गेली. ती माणसांत आली. आपण निरुपयोगी आहोंत, आपणावर कुणाची माया नाहीं, असें वाटण्याचें कारण आतां उरलें नाहीं. आतां तिला मैत्रिणी मिळाल्या होत्या. त्या दिवसापासून मीना अगदीं बदलून गेली. आतां ती पूर्वीप्रमाणें अबोलपणें काम करीत नसे. तिच्या चेहऱ्यावर स्मित झळके आणि प्रत्येकाशीं एकादा तरी गोड शब्द ती बोले. पूर्वीपेक्षां दिवस आतां भराभर जाऊं लागले आणि इतर स्त्रियांना जरी नाहीं, तरी मीनाला मात्र तो तुरुंग घरासारखा वाटूं लागला.